


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन








अनुक्रमणिका

# दीपावली

गणराज्य दिन विशेषांक

फेब्रुवारी १९६५ • मूल्य १। रु.

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

# श्रेयनामावलि

| | |
|---|---|
| **क्रांति संस्मरण** | ● **वसंत पोतदार**–विजेचीं बीजें |
| **लेख** | ● **श्रीरंग**–वन्य ते गायनी कळा |
| **प्रवासवर्णन** | ● **पु. भा. भावे**–उत्तर दिग्विजय (समराच्या पार्श्वभूमीवरील प्रवास) |
| **ललित निबंध** | ● **रविंद्र पिंगे**–मागीलदार (पुढील दारीं वसून वाचण्याजोगा) |
| **क्रीडा** | ● **दि. श्री. कराडकर**–सोवर्संचें क्रिकेट (क्रिकेटचा सीझन म्हणून) |
| **कथा** | ● **सुरेश वेंगुर्लेकर**–तूं विवस्त्रा वस्त्रांकिता ! |
| | ● **मनोहर तल्हार**–अथांग |
| | ● **दिलीप चित्रे**–व्हायरस |
| | ● **प्रभाकर ना. परांजपे**–भिरभिरें |
| | ● **आनंद साधले**–नवरा माझा मुठींत |
| | ● **मुकुंद पंडित**–माऊ वेलदाराची वारी |
| **काव्य** | ● **मधुसूधन गोखले** ☆ **स. वि. करंदीकर** |
| **प्रदीर्घ साहसकथा** | ● **श्रीकृष्ण ठाकूर**–ध्रुव ढळला (अखेरचें प्रकरण) |

शिवाय– दीपमाला, सन्मानपुष्पें, चांदण्यांचें जग, व्यंगचित्रें इत्यादि



# दीपावली

**साहित्य-कला-सङ्गम**

गणराज्य दिन विशेषांक


**वर्ष २० वें**

**फेब्रुवारी १९६५**

**किंमत १। रुपया**

**दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

टे. नं. ७७७६५

**Gram : Dalalart**

✽ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु. + रजि. पोस्ट ५५ पै. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं. ✽ प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.
**Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57**


अनुक्रमणिका

**दीपावली**

## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# नमोस्तु ते

**२६ जानेवारी १९६५!**

लोकशाहीनिष्ठ, स्वतंत्र सार्वभौम्य भारताचा पंधरावा वर्धापन दिन! आधुनिक भारताच्या इतिहासांतलें एक सुवर्णपान! लोकशाहीवर श्रद्धा बाळगणाऱ्या आधुनिक जगाच्या दृष्टीनें आशेचा, विश्वासाचा आणि अभिमानाचा दिवस! तुमच्या आमच्या इच्छा आकांक्षांचें एकमेव केंद्रस्थान! आज प्रजासत्ताक भारताला अभिवादन करतांना आपणां साऱ्यांचीच छाती अभिमानानें भरून येणें स्वाभाविक आहे. हें अभिवादन करतांना आपण नेमकें कशाला अभिवादन करतों? कशामुळें नत होतों? कुणाचा जयजयकार करतों? "इंडिया दॅट इज़ भारत" ह्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या एका राज्यालाच केवळ आपण अभिवादन करतों कीं, त्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या भूभागाला—माती, दगड, नद्या, झाडें, सरोवरें, इमारती, देवळें वा मशिदी, शाळा वा महाविद्यालयें—यापैकीं कशाला तरी एकाला वा सामुदायिकरित्या सर्वांना आपण अभिवादन करतो? ह्या मातीचा मी पुत्र आहे—हिचें स्तन्य मी प्यालो आहे, असें जेव्हां आपण म्हणतो तेव्हां एक विशिष्ट 'भू-भागच' आपल्याला सुचवायचा असतो काय? आम्हांस असें वाटत नाहीं. आपण ह्या मातीचा उल्लेख जो करतो तो जड मातीचा, दगडांचा करीत नाहीं. त्या मातीनें दिलेल्या चैतन्याचा तो जयजयकार असतो. भारताच्या ध्वजाला अभिवादन करतांना आपण एका तीन रंगी फडक्याला अभिवादन करीत नाहीं. त्या निर्जीव फडक्याच्या धाग्याधाग्यांतून विणल्या गेलेल्या चैतन्यमय इतिहासाला, परंपरेला, मूल्यांना, संस्कृतीतल्या शाश्वत अशा श्रद्धांना, त्या श्रद्धांसाठीं आमरण झटणाऱ्या वीर–धीर पुरुषांना, त्यांच्या त्यागाला आणि हौतात्म्याला तें अभिवादन असते. निर्जीव मातीला सजीवता येते ती माणसांच्या सजीवतेंतून! त्या त्या देशांचा इतिहास घडतो त्या देशांच्या माणसांच्या सजीवतेंतून! चैतन्यमयतेंतून! भारताच्या ह्या प्रजासत्ताकाला अभिवादन करतांना हजारों वर्षे अनेक आघात प्रत्याघात पचवूनही सजीव 'चिरनव राहिलेल्या' त्या चैतन्यालाच आम्ही प्रणाम करीत असतो असें आम्हांस वाटते. जय पराजय हे तर जीवनसंघर्षातले एक अपरिहार्य फलित! कधीं तें पारडें इकडे तर कधीं तिकडे झुकते. पण पराभवांतून जें ताठपणें उभें राहतें तें आत्मबल! मनांतली अदम्य आकांक्षा! देशाचे इतिहास घडतात ते ह्या आत्मबलांतून, ह्या आकांक्षेतूनच! आमच्या इतिहासानें चढउतार पुष्कळ पाहिले. आजही सुराज्याचें स्वप्न अपुरेंच राहिलें आहे. प्रजासत्ताकाचा जयजयकार करतांना उरांत उमेद आहे पण खंतीही आहेत. अन्न, वस्त्र, निवारा ह्या मानवाच्या प्राथमिक गरजाही आज भागत नाहींत. रोजचा दिवस हा नवा स्वप्नभंग घेऊनच जणुं स्वागताला येतो आहे. पण तरीही आम्ही भारताच्या प्रजासत्ताकाचा जयजयकार करतो. केलाही पाहिजे कारण तो जयजयकार अखेर आम्हांला कांक्षा देणाऱ्या चैतन्याचा आहे ह्याची आम्हांला जाणीव आहे. त्या जयजयकारांतूनच नवा विश्वास मिळणार आहे. नवें आत्मबल प्रगटणार आहे. नव्या इतिहासाची प्रेरणा मिळणार आहे. अखेर इतिहास सिद्ध होतो तो निर्जीव सनावल्यांतून नव्हे तर सजीव माणसांच्या तेजोमय कृतींतून! हें प्रजासत्ताक निर्माण्यासाठीं ज्यांनीं ज्यांनीं ती तेजाची पूजा बांधली त्या साऱ्यांनाच आम्ही ह्या निमित्तानें अभिवादन करतों.

प्रजासत्ताक भारताचा विजय असो.

जयहिंद!!

—**संपादक**



अनुक्रमणिका

**इतिहासाच्या पानोपानीं अशी रंगली गीता**
**वंदन करुनी त्या वीरांना आज गात ही गाथा**




**-वसंत पोतदार**

**"खूब** लढी मर्दानी वह तो झांसीवाली रानी थी" हें त्या प्रबळ अबलेचं, २३ वर्षे वयाच्या विधवा महाराणीचं वर्णन आहे, जिनं फिरंग्यांच्या शिरकाणावर धडाडून पहिला हल्ला चढविला. तें काहीं मिशी कापण्याच्या कात्रीनें रिबन कापून उद्घाटन करण्याइतकं सोप काम नव्हतं. तर भल्या भल्या दरबार बहाद्दरांनी मिशी झुकवून मांडलिकत्व पत्करलेल्या गोऱ्या गनिमाविरुद्ध सर्व प्रथम रणशिंग फुंकण्याचं संग्राम कार्य होतं. लक्ष्मीबाई म्हणजे जणुं भारत मातेचा अवतार होता. कारण तिच्या रक्तांतून हौतात्म्य पेरलं गेलं. दशकानुदशके विजेचीं बीजें पेरली गेली, त्यांचे कोवळे अंकूर फुटले अन् कोवळ्या वयांतच गोऱ्या अंमलदारांवर कडाडून कोसळले. बीज क्षणार्धासाठीं चकाकली पण बीज पेरून गेली. कोंवळ्या वयाचे तिघेहि विवाहित चाफेकर बंधु—

**देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमार यौवनं जरा।**
**तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ।।**

ह्या गीतेचा श्लोक म्हणत फांसावर लटकले अन् पाठोपाठ

**"श्यामलां सरलां सुस्मिताम् भूषिताम्**
**धरणी भरणी मातरम्**
**वन्दे मातरम्"**

हे मंगल मंत्र गात गात १९ वर्षाचे खुदिराम बोस दोरखंडाला झोंपाळा मानून आनंदानें त्यावर चढले.

ब्रिटिश साम्राज्यशाहीला लकवा लागावा असा भयंकर हादरा खुदिरामांनीं सर्वप्रथम बॉम्ब फेकून दिला. फांसावर जातेवेळीं त्यांच्या मुद्रेवरील हावभावांचं वर्णन करतांना त्यांचे वकील उपेन्द्रनाथ सेन ह्यांनीं लिहिलं आहे:—

"गीता हातांत घेऊन फांसावर जातेवेळीं खुदिरामानी माझ्याकडे सस्मित मुद्रेनें पाहिलं अन् ते इतक्या निर्भयतेनें वधस्तंभाकडे जात होते कीं जणुं त्यांच्या समवेतचे सशस्त्र रक्षक त्यांना तिकडे नेत नसून तेच रक्षकांना वधस्तंभाकडे नेत होते." खुदिरामांची ही सस्मित मुद्रा म्हणजे एखाद्या टूथ पेस्ट कंपनीच्या जाहिरातीसाठीं फाकलेली दंतपंक्ति नव्हती. तर कोंवळ्या अन् कढत धारदार रक्तानें गुलामीचे पाश कापण्याचा तो एक १९ वर्षाच्या पोराचा देशभक्तीचा हट्ट होता. मातेसाठीं, भारत मातेच्या मुक्तीसाठीं आत्मबलिदानानें पुरा केलेला तो बालहट्ट होता.

खुदिरामांनीं फेंकलेल्या बाँबचा आवाज सातासमुद्रापलीकडे ऐकूं गेला. त्यांच्या रक्तस्नेहानें लंडनमध्यें अभ्यासक्रमासाठीं गेलेल्या एका तरुणाच्या अंतःकरणात क्रांतीची ज्योत पेटली. स्वातंत्र्यवीर सावरकरानी ही ज्योत जगवली अन् पुन्हां विजेचं बीज नंग्या तलवारीसारखं लखलखलं. मदनलाल धिंग्रानें लंडनमध्येच कर्झन वायलीच्या गळ्यांत पिस्तुलीच्या सहा छर्‍यांची माळ घातली. कर्झन कोसळतांच दोघांनीं येऊन धिंग्रांचा हात धरला त्यावर ते दाटूनच म्हणाले, "हात सोडा, कोटाची इस्त्री खराब होत आहे... मी स्वतःच चौकीवर येत आहे."

हे एका देशभक्तीचं वारं प्यायलेल्या विशीतल्या तरुणाचं चित्र आहे. ज्यानें इस्त्रीची निगा राखण्याची ऐट दाखविली पण तेथून सरळ खरखरीत दोरखंडाला आलिंगन द्यायला गेला...... अन् आजचा कांजीवाला डॅंडी 'बरा दिसतोय' कीं नाहीं ह्या फिकिरीत एखाद्या थेटरात नाहींतर बगीच्यात किमानपक्षी स्वप्नांत x x x तरी आलिंगन देण्यास जात असतो.

पण हे हुतात्मे म्हणजे जळजळित निखारे होते, देशभक्तीचा लाव्हा उदरांत दडवून बसलेले हे ज्वालामुखी होते. 'आधीं बिज एकले' त्या झांशीच्या "त्वं हि दुर्गादशप्रह रणधारीणि"नें पेरलेली ही विजेचीं बीजं होती.

मदनलाल तर धैर्यमेरू होते. जेलखान्यांत ते थट्टा विनोद, मस्करींत दंग असत. फांसावर चढणाऱ्या आपल्या स्नेह्याला खिन्न चेहऱ्यानें भेटायला येणारे त्यांचे स्नेही, त्यांच्या गप्पाष्टकांत प्रफुल्ल वृत्तीनें कारागाराबाहेर येत.

१७ ऑगस्ट १९०९ ला मदनलाल धिंग्रांनी मृत्यूच्या दारांतून मुक्तीच्या दरबारांत प्रवेश केला अन् त्यानंतर चार महिन्यांनींच नाशीकचा बीलझेबूब जॅक्सन ह्याचा वध करून अनंतराव कान्हेरे त्यांच्या सोबतीला निघून गेले. हौतात्म्याचा विद्युत्प्रवाह अधिकच वेगवान झाला. कारण अनंतराव कान्हेरे आत्तापर्यंतच्या क्रान्तिरत्नांमध्यें सर्वांत लहान होते. आत्ता पर्यंतच्याच नव्हे तर गोऱ्या जमातीची कृष्णछाया दूर सारण्यासाठीं ज्या लेकरांनी बलिवेदीवर झेंप घतली त्यांच्यामध्यें एक

नकलत। वरूआचा शूर अपवाद वगळला तर बहुवा अनंतरावच कोंवळ्या वयाचे होते.

कनकलता १४ व्या वर्षी कोमेजली. १९४२ च्या जन आंदोलनांत आसामांतील गोपूर चौकी सर करण्यासाठीं निघालेल्या जमावाचं नेतृत्व ही वालिका करीत होती. चौकीतून धमकावणी देण्यात आली.

"येथून काळं करा, नाहींतर गोळ्यांचा वर्षात्र केला जाईल."

यावर ती मिरमुटली लक्ष्मीवाई उत्तरली,

"ही चौकी जनतेची सम्पत्ती आहे; म्हणून आम्ही ती कात्रीज करण्यासाठीं आलो आहोंत. तुम्ही स्वतःला जनतेचे सेवक समजत नसाल तर चालते व्हा; चौकी सोडा."

पुन्हां धमकीचा स्वर आला परंतु कनकलतानें पाऊल पुढें टाकलं होतं सूं सूं करीत गोळी आली आणि कनकलता ह्या कोंवळ्या वेलीचं सोन झालं. पण तिच्या अचाट धाडासानें जनता 'चेत भवानी चेत' ह्या चेतनेनें पुढें सरसावली. गोळ्यांचा वर्षाव, रक्ताच्या चिलकांड्या, दहा वीस, तीस, चाळीस, पन्नास, साठ ! कनकलतेच्या भोंवतीं ६० भारतीय जीवनाची बाजी खेळले.

हुतात्मा अनंतहि वयानें लहान होता. पण ब्रिटिशांच्या घमेंडखोर राजवटीबद्दल त्याच्या उरांत चीड होती. २१ डिसेंबर १९०९ ला तो औरंगाबादहून नाशकास धावून आला आणि विजयानंद नाट्यागृहांत किर्लोस्कर मंडळीच्या 'शारदा' नाटकांतील दुसऱ्या प्रवेशांतल्या कोदंडाचे 'नामे ब्राह्मण खरा असे हा' ह्या साकीचे सूर तारस्वरांत चढले असतां – गोळ्या घालून त्यानें जॅक्सनला ठार केलें.



परंतु फांसावर चढेपर्यंत न्यायालयांत त्यांनीं तोंडातून चकार शब्द काढला नाहीं. प्रश्नांना उतरं नाहींत; खोट्या आरोपांची सफाई नाहीं; नेत्यांचीं व्याख्यानवाजीही नाहीं. फक्त वेफिकिरी ! ती कशी हे बॅरिस्टर जयकरांच्या आत्मचरित्रांतील दुसऱ्या भागांतल्या खालील ओळीवरून कळते–

"I used to attend Kanhere's trial at the High Court and was struck with the fact that while the trial was going on this young man took no notice of it, asked no Questions and answered none, being the whole time busy with something in his hand."

अनंतरावांनीं नाशकांत केलेल्या बॉम्बस्फोटानें हौतात्म्याचा अंकुर आणखीनच मोहरून उठला आणि पुन्हा एका महाराष्ट्रीयाने साहेबाच्या राजवटीवर वडाडून हल्ला चढवला. १९१४ च्या जागितक युद्धानें घर सुकण्याची पाळी आली होती. आणि त्याच वेळीं तात्या टोप्यांच वारसा घेऊन गनिमी काव्यानें सशस्त्र क्रान्तीचं फार मोठं जाळं एका सेनापतीनें पंजाव, वंगाल, व उत्तर प्रदेशांत पसरविलं. ह्या क्रांतिरत्नाचं नांव विष्णु गणेश पिंगळे.

तळेगांव ढमढेऱ्याच्या गणेशपंत पिंगळ्यांच्या ५ अपत्यांमधले विष्णुपंत ! घरचे दारिद्र्य असूनही मॅट्रिक होतांच स्वकष्टानें पैसा जमवून मॅकेनिकल इंजिनिअर होण्यासाठीं वयाच्या २१ वर्षी अमेरिकेस रवाना झाले.

त्याचवेळीं अमेरिकेंत लाला हरदयाळ ह्या ऑक्सफर्डच्या पदवीधरानें तेथील चार-साडेचार हजार भारतीय तरुणांना जमवून गदर संस्था स्थापली होती. शाळेंत असतांना कवि गोविंदांच्या "रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळाले" व "गणया घे हातीं तलवार रे, हो संगरा तयार," असल्या स्फूर्तिदायक कवनानें पिंगळ्यांचा पिंड गुलामगिरी विरुद्ध वंडखोरी करण्यास नकळत तयार झाला होता. त्यांनीं तावडतोव गदरचे सदस्यत्व स्वीकारले. लाला हरदयाळांचे तोडीचे पुढारीपण मिळविले आणि ऐन महायुद्धाच्या प्रसंगीं हिंदी सैन्यांत सरकार विरोधी वातावरण निर्माण करण्याच्या कामगिरीवर पिंगळे भारतांत आले.

मराठी, हिन्दी, पंजावी, गुरुमुखी, उर्दु व इंग्रजी भाषांवर त्यांचें असामान्य प्रभुत्व होतें. शिवाय ते अत्यंत देखणे होते. अमेरिकेंतून ते सरळ पंजाव व वंगाल भागांत घुसले व अनेक वेष पालटून व नाना नांवें घेऊन त्यांनीं श्री रामबिहारी घोष यांच्यावरोवर हिन्दी सैन्याला ब्रिटिशाविरुद्ध भडकविण्यास सुरवात केली.

पिंगळ्यांच्या कटांत शेकडों, हजारों तरुण क्रांतिकारी सामील झाले. गुप्त सभा होऊं लागल्या. वॉम्वपेट्यांची आयात होऊं लागली. एक मार्च १९१५ ला भारतीय सैनिक युद्धावर जाणार होते. त्यापूर्वीच पिंगळ्यांना आपलं साध्य साधायचे होतें. पण देशद्रोह्यांची जमात पुन्हां आडवी आली. मिरत कॅम्पच्या एका अफगाण दुफ्फेदारानें दगा करून त्याच्या तंवूंत लपलेल्या पिंगळ्यांना अटक करविली. त्यावेळीं

[ पृष्ठ ६५ वर पहा ]












# धन्य ते गायनी कळा



नृत्यगुरु : भस्मासूर

**महाराष्ट्र** राज्याच्या करमणुक विभागातर्फे साजरा झालेला-चौथा-नऊ दिवसांचा सामयाग, यावर्षी आम्ही मोठ्या उत्सुकतेनें ऐकला आणि पाहिला. कान आणि डोळे तृप्त झाले. भारतवर्षांत नांव गाजविणारे जवळ जवळ पंचाहत्तर प्रथम श्रेणीचे कलावंत या यज्ञाला हजर राहिले होते. संस्थानें विलीन झाल्यानंतर 'आतां आमचें कसें होणार; आमचा त्राता कोण ?' अशा प्रश्नांनी संगीतांतील घराणे-दार कलावंत भिऊन गेला होता; पण या उत्सवांत जे जे कलावंत आम्ही पाहिले त्यांना संस्थानें विलीन झालीं ही फारच उत्तम गोष्ट झाली असें निश्चित वाटत असलें पाहिजे, असें या सर्व थोर कलावंतांची प्रसन्नता पाहून आम्हांला वाटलें.

नवभारतांतील उच्च कोटीचे कलावंत आज स्वतंत्र आहे, सुखी आहे. पूर्वी संस्थानाधिपतीच्या लहरीवर त्यांना नाचावें लागत होतें. संस्थानी कोठींतून भत्ता आणि तनखा मिळत होता हें खरें; पण त्यासाठीं चोवीस तास राजाची मर्जी सांभाळीत हांजी हांजी करीत दिवस कंठणें हेंच नशीबीं होतें. राजा प्रसन्न झाल तर नशीब खुलतहि असे; पण त्याकरितां दैवाची परीक्षा पहात वर्षेनुवर्षे काढावीं लागत. आज प्रथम श्रेणीच्या एकेका कलावंताची बिदागी हजारों रुपये आहे. आणि इतकेंहि असून या कलावंतांना फुरसद नाहीं ही आश्चर्याची गोष्ट नाहीं असें कोण म्हणेल ? भारत सरकार तर या कलावंतांच्या रक्षणासाठीं बद्धपरिकर आहेच; पण जनताहि आपला जीव कुर्बान करून त्यांचें कौतुक करीत आहे.

## रसिकतेला धन्यवाद

महाराष्ट्र राज्यानें साजरा केलेला हा संगीतोत्सव दादर येथील डि सिल्व्हा हायस्कूलच्या पटांगणांत खास उभारलेल्या मंडपांत झाला. रोज रात्रीं आठ वाजल्यापासून पुढें साडेपांच ते सहा कधीं सात तासपर्यंत जलसा चालत असे. आणि रोजच सहा ते सात हजार स्त्री-पुरुष श्रोते दाटीनें हजर असत. ऐन थंडीचा मोसम. झोंबरे आणि चावरे वारे रात्रीवर आपला अधिकार गाजवित असलेले. अशावेळीं वास्तविक जाड पांघरूण डोक्यावरून ओढून घेऊन गुडुप झोपेचें सुख घ्यावयाचें; पण नाहीं. मुंबईकरांची रसिकताहि कलावंतांच्या वृत्तीसारखीच कलंदर. ती कुठें आणि कशी उधाणाला येईल सांगणें कठीण आहे. या ठिकाणीं मात्र ती योग्यवेळीं उफाळून आली याबद्दल त्या रसिकतेला धन्यवाद दिले पाहिजेत.

आठाच्या ऐवजीं आम्ही थोडे उशीरानें मंडपांत पाऊल ठेवलें तर कशीबशी जागा मिळत असे, अशावेळीं डॉ. केसकरांची आम्हांला दाटून आठवण येई. केसकर नभोवाणी मंत्री होते तेव्हां त्यांनी भारतीय संगीताच्या पुनर्वैभवासाठीं त्यांनी अतोनात प्रयत्न केले होते. तत्पूर्वी हलक्या–फुलक्या संगीताचें जिकडे तिकडे थैमान चालू होतें. उठसूट कुणीहि शास्त्रीय संगीतांत गळा घालीत होता. आकाशवाणीवर वशिल्यानें अनेकांचें कंठवादन चालू होतें. जरासा सुरांत गळा काढतां आला, कीं तरुण, तरुणी (आणि बालाहि) आकाशवाणीकडे धांव घेत असत; मोठमोठे राग गात असत. 'बहुजनहिताय' हें आकाशवाणीचें ब्रीदवाक्य असल्यानें कुणीकुणाला कांहींहि पुसूं शकत नव्हता.

## यांत दुमत नसावें

डॉ. केसकरांनी समिति नेमली. परीक्षक नेमले आणि बरें कोणतें, वाईट कोणतें याची शहानिशा करायची आज्ञा केली. झालें ! 'रेडियो स्टार' अशी पदवी लावणाऱ्यांचें धाबें दणाणलें. आणि मग जो गोंधळ झाला तो सर्वश्रुत आहे. कलाकारांचा ऐतिहासिक 'संप' झाला तो याच काळांत. शेवटीं कलाकारांनाच नमावें लागलें. संपाचे पुढारी म्हणविणारे मागल्या दारानें आंत घुसले. ज्यांना आकाशवाणीवर आपली वर्णी लावायची होती त्यांना रीतसर अभ्यास करावा लागला; व त्यामुळें शास्त्रीय संगीताचा व्यासंग वाढला. बहुजनसमाजाला अभिजात संगीतांतील रस घेतां येऊं लागला. महाराष्ट्र राज्याच्या या चौथ्या नऊ दिवसांच्या संगीत-नृत्य महोत्सवांत नित्य जो विराट श्रोतृसमुदाय जमत असे तो यामुळेंच होय, व त्यासाठीं डॉ. केसकरांना आम्ही या ठिकाणीं धन्यवाद दिले तर कुणाचें दुमत होणार नाहीं.

महाराष्ट्र हा बुद्धिवादी लोकांचा देश आहे. प्रत्येक क्षेत्रांत त्याला नित्य नवेपणा हवा आहे. त्यामुळें सरकारच्या करमणुक विभागानें यावर्षी महोत्सवांतील एक एक दिवस अभिजात संगीतांतील एकेका 'घराण्याला,' दिला हेंच श्रोत्यांना नाविन्य वाटलें. 'घराणें' हा शब्दच मुळीं महाराष्ट्रीयांना अत्यंत प्रिय आहे. आपल्या घराण्याच्या प्रतिष्ठेला साजेल असें कांहींतरी आपल्या हातून घडावें अशी येथील प्रत्येकाची तळमळ असते. त्यामुळें हा मनोपिंड अन्य घरंदाजांचें पाणी पाहायला सदैव आसुसलेला असतो. एका दिवशीं एकाच घराण्याच्या गायक वादकांनी सादर केलेले कार्यक्रम निरस वाटण्याचा संभव आहे असें या योजनेबद्दल अनेकांचें मत होतें; पण प्रत्यक्षांत निराळा अनुभव आला. अशा घराणानिहाय योजनेमुळें श्रोत्यांना त्यांतील वैविध्यें उमगलीं. चोखंदळांना उच्चनिचता कळून आली. सर्वसामान्य श्रोत्यांनें








संगीतांतील घराण्याचें स्वरूप कळलें. हिंदुस्थानांत साजऱ्या होणाऱ्या कोणत्याहि संगीतोत्सवांत आतांपर्यंत अशी योजना आढळली नाहीं, असें संगीतांतील जाणतीं माणसें म्हणालीं.

## रंगदेवतेला आवाहन

या संगीतोत्सवाचें नमन सुविख्यात ध्रुपद गायक डागर बंधु यांनी घातलें. 'बिहाग' रागाची त्यांनी वीणेच्या अंगानें अशी काय आलापी केली कीं काय सांगूं; ध्रुपद-धमार गायकी ही एकेकाळची साक्षात्कारी गायकी. अनेक चमत्कार या गायकीनें घडविलेले आपण इतिहासांत वाचतों. तिचें अस्सल स्वरूप केवळ डागरबंधूंकडेच आपल्याला ऐकायला मिळतें. डागरबंधूंची ती संथ, शास्त्रशुद्ध, वजनदार, चिवट आलापी ऐकतांना आनंद झाला. वाटलें—रंगदेवतेला आवाहन करण्याकरितां हें सामगायन चालू आहे. आणि खरोखरीच त्या आवाहनाला प्रतिसाद देऊन त्या क्षणीं प्रसन्न झालेली रंगदेवता नऊहि रात्री तशीच स्थिर राहिली. एकाहि क्षणीं बेरंग झाला नाहीं. रंग चढतच राहिला. याच दिवशीं अमीर खाँ यांनाहि आम्ही ऐकलें. पण डागरबंधूंनी जी धुंदी आम्हांला चढविली ती धुंदी इंदौर घराण्याचा हा गायक पुसून टाकूं शकला नाहीं किंवा तीवर आणखी कोणते संस्कारहि करूं शकला नाहीं.

याच दिवशीं आम्ही विविध तऱ्हेचीं तालवाद्येंहि ऐकलीं. त्यांत अहमदजान थिरकवा यांचा रंग आणि अमीर हुसेन खाँ यांची घरंदाज विद्या यांचें आम्हांला मनोज्ञ दर्शन घडलें. तंतकारांत आम्हांला थोडासा आनंद अलि अकबरांनी दिला. इतरांनी साधनेनें तयार केलेली करामत बरी वाटली.



चकाकतें तें सोनें नसतें.

कलेकलेनें वाढणाऱ्या हेमंतांतल्या शीतल चांदण्यांत बसून कसलेल्या गवय्यांकडून दरबारी कानड्यासारखा गंभीर व भारदस्त राग ऐकण्यांत काय सुख आहे हें प्रत्यक्ष अनुभवाशिवाय कळणार नाहीं. हा एकच राग या संगीतोत्सवांत तीन घराण्यांतील गवय्यांकडून तीन प्रकारें आम्ही ऐकला. 'इंदौर' घराण्याचे अमीर खाँ, 'किराना' घराण्याचे पं. भीमसेन जोशी व 'ग्वाल्हेर' घराण्याचे वयोवृद्ध पंडित पद्मश्री ओंकारनाथ ठाकूर या तिघांनीं त्यांच्या पाळीप्रमाणें तो गायला. या तिघांत सरस निरसता ठरवायची झाल्यास मैफल गाजविली भीमसेननींच असें निःपक्षपातीपणें म्हणावें लागेल. त्यांचा 'दरबारी' सर्वांगसुंदर झाला.

## ही चूक नाहीं का ?

दरबारी कानड्यांतील आलापन ऐकतांना सर्व सात्विक भावनांचें उद्दीपन झालें पाहिजे. त्यांतील गांधार-धैवताच्या कोमलकरुण आंदोलनाबरोबर काळीज हाललें पाहिजे. रंध्रारंध्रांत स्वरांनी प्रवेश केला पाहिजे. दरबारींत मागणें आहे, आळवणी आहे, दया, क्षमा, शांतीला आवाहन आहे. हीं सर्व वैशिष्ट्यें व्यक्त करण्यांत भीमसेन यशस्वी झाले. दरबारीनें निर्माण केलेलें गांभीर्ययुक्त वातावरण 'सुहाकानडा' गाऊन त्यांनी खेळकर केलें. शेवटीं त्यांनीं 'जोगिया' रागांतील "पिया के मीलन की आस" ही ठुमरी गायली. ती उत्तमच गायली; परंतु आपल्यामागून अन्य गायक गाणारे असतांना जोगियासारखा आर्त व शोकाकुल भावना व्यक्त करणारा, सारें वातावरण शुष्क करणारा राग गाऊं नये. कदाचित् अभावितपणें ही गोष्ट घडली असावी; पण मोगुबाई कुर्डीकर या श्रेष्ठ गायिकेनें देखील रात्रीचे सव्वानऊहि वाजले नसतांना 'संपूर्ण मालकंस' गाऊन अशीच चूक केली होती.

आपल्या मागून आपल्याच घराण्यांतील अन्य गायिकेचा कार्यक्रम व्हायचा असतांना आणि पुढें चार पांच तास मैफल असतांना अशा रीतीनें 'आरती'चें वातावरण निर्माण करणें ही चांगली गोष्ट नाहीं. ओंकारनाथ ठाकुरांनी तर मैफलीच्या पूर्वार्धांतच भैरवी गायली. त्यांचें सर्व गाणेंच भैरवी अंगाचें झालें त्यामुळें गढूळलेलें वातावरण पुढें ठुमरी गायिकांनी रंगविलें ही गोष्ट वेगळी, पण असंख्य मैफलींत गायलेल्या आणि गाजविलेल्या या



नेत्रदीपक नृत्यकळा

तपस्व्यानें हें तारतम्य राखायला पाहिजे होतें. बडे गुलामअल्लींनी मात्र सर्व प्रकारें आनंद दिला. त्यांचें गाणें आम्ही अजून विसरलेलों नाहीं. अजून त्यांचे ख्यालांतील स्वर त्यांची तनायत त्यांची 'सोरठ' रागांतील द्रुत चिज त्यांची ठुमरी जशीच्या तशीच आठवते आहे. सौंदर्यसंपन्न गाणें कसें असावें याचा गुलाम अल्लींची बैठक हा उत्कृष्ट नमुना होता.

## कांहीं संस्मरणीय प्रसंग

तरुण गायकांत हफीज अहमद खाँ, कुमार गंधर्व चांगले गायले. कुमारांचा 'बिहाग' उत्तम झाला. आणि निर्गुण भजनहि रंगलें. हिराबाईंची बैठक चांगली झाली. शेवटचा दिवस ठुमरी गायिकांनी विशेषतः गिरिजादेवींच्या गायनानें संस्मरणीय झाला.

नृत्यकारांत 'कथाकली' नृत्यकारांनी व त्यांतील प्रमुख अशा गुरु कृष्णन् कुट्टी व राघवन् नायर यांनी आम्हांला अपार आनंद दिला. यामिनी कृष्णमूर्ति यांनी 'कुचिपुडी' हा नृत्यप्रकार नाचतांना पाण्यानें भरलेली तपेली डोक्यावर ठेवून (प्रेक्षकांसमोर ती त्यांनी पाण्यानें भरली होती.) थाळीच्या काठावर

[ पृष्ठ ६१ वर पहा ]

**जवान धारातीर्थी पडला. त्याची राख झाली. पण कृष्णाचें तें चित्र मात्र आग पिऊन, पचवून उरलें. चरण स्पर्शानें यमुनेचें उसळते पाणी हटलें, तसा अग्नि हटला. चित्र सुरक्षित राहिलें व येथें लागलें. कृष्ण त्याची सोबत करीत होता, त्या एकशें चौदा अहिर वीरांची व त्या सव्वीस गुरखा सैनिकांची —**



पु. भा. भावे

**सकाळीं** आम्ही निघालों. वोचकी सोडणें, वोचकी बांधणें, थांबणें व निघणें हा आतां एक दैनंदिन कार्यक्रमच झाला होता. तोच अंगवळणी पडूं पहात होता. प्रातर्विधी, चहा न्याहारी आटोपून आम्ही वाहनांत बसलों. ह्या तळावर आमच्या गल्लींतला एक तरुण माणूस मला भेटला होता. "तुम्हांला काय पाहिजे बोला ?" तो मला म्हणाला "हवें तें देतो !" आमच्या सिगारेट्सचा सांठा खालावला होता. म्हणून "हवें तें देतो" म्हणणाऱ्या त्या वरदात्या तरुणापाशीं मी केवळ सिगारेट्स मागितल्या. भल्या सकाळीं त्यानें मला "कॅप्स्टन"व "गोल्डफ्लेक" चीं वरीचशी पाकिटें आणून दिली. देऊं केलेलें द्रव्य स्वच्छ नाकारलें. येथेंच भुयारी खोल्यांतून रहाणाऱ्या जाटांनीं आम्हांला "चुरम्या"चा (तूप, साखर, रोटीचा कुस्कर) प्रसाद दिला. हे सारे प्रसाद कृतज्ञतापूर्वक घेऊन आम्ही दि. २८ च्या त्या शहारणाऱ्या सकाळीं मार्गस्थ झालों. (सकाळीं म्हणजे सरासरी अकरा वाजतां. शून्याखालीं आठ अंश गेलेल्या तपमानामुळें अकरा म्हणजे आम्हांला सकाळच वाटत होती.) आमचा बराच प्रवास "टांगसे" नदीच्या खोऱ्यांतूनच चालूं होता. खोरें तरी कशाचें; नदी आमच्या शेजारूनच वहात होती. रेती व गोटे सर्व दूर पसरले होते. जीप अगणित धक्के घेत होती. मला त्या वाहनाची, व तें वाहन हांकणाऱ्या मैत्र महाशयांची धन्यता वाटत होती. धन्यवाद आमच्या शरीरांनाहि दिले पाहिजेत. कारण शरीरांतले प्रत्येक हाड घुसळून निघत असतांहि तें धड राहिलें होते. चेहरे पालटण्यांत पटाईत असलेले माडगूळकर आपापतः पालटणाऱ्या चेहऱ्याला अभिनयाची डूब देऊन प्रसंग गोड करीत होते. म्हणजे त्यांच्या चेहऱ्यावर "वास्तव्य" व "कला" यांचा अपूर्व संगम पहावयास मिळत होता. एकेका ठिकाणीं "वाट" इतकी निरुंद होती कीं, कांहीं अंगुळांची चूक म्हणजे यमलोकीचें निमंत्रण ठरलें असते. पण त्याच वाटेनें आमचा प्रवास चालूं होता. धूळ, रेती, गोटे, व वर्फमय झालेले नाले ह्यांचें येथें साम्राज्य होतें. नेहमीं झाडें पाहणाऱ्या डोळ्यांना हा देखावाहि वेगळा आणि चांगलासुद्धां वाटूं शकतो. चुशूलपर्यंत आम्हांला जावयाचें होतें. म्हणजे सरासरी सदुसष्ट मैल अंतर ह्या गतीनें व ह्या वाटेनें कांपावयाचें होतें. बऱ्या वाटेनें हा प्रवास फार तर दीड दोन तासांत संपावयास चिंता नव्हती. पण ही वाट "बंडाकठिन जमघाट" ह्या जातींतली होती. ती संपतां संपत नव्हती. म्हणून एका छोट्या तळावर आम्ही "मध्यंतर" घेतला. ह्या मध्यंतराचा विनियोग आम्ही पोटपूजेसाठीं केला. आमच्या सरबराईसाठीं तेथें प्रत्यक्ष लेहचे राजे उपस्थित होते. हे राजेमहाशय भारतीय सैन्यांत अधिकारी आहेत. सैनिकी गणवेषानें त्यांचें राजेपण पार झांकून टाकले होतें. सामान्य जनांशीं ते अगदीं एकरूप होऊन गेले होते. फार तत्परतेनें त्यांनीं आमचे "हवें नको" पाहिलें व बांधून आणलेली शिदोरी आम्ही संपवितांच आम्हांला स्वहस्तें बनविलेला चहा व निरोप दिला. आमचा प्रवास पुन्हां सुरूं झाला. तोच अमर्यादपणें पसरलेला वैराण प्रदेश ! क्वचित् कोठे वाळवंटी झुडपें ! त्या पार्श्वभूमीवर स्तब्धपणें उभा असलेला एक काळा रानघोडा आम्ही पाहिला. प्रथम वाटलं तो घोडा नव्हे, घोड्याचा पुतळा आहे. इतक्या निचेष्टपणें तो उभा होता. त्यानें हालचाल केली तेव्हां कळलें कीं हा जिवंत घोडा आहे. घोड्याप्रमाणेंच कांहीं कावळेहि ह्या प्रदेशांत आम्ही पाहिलें व त्या प्राण्याच्या सर्व संचारित्वाविषयीं कौतुक वाटलें. लडाखी कावळे मराठी कावळ्यांपेक्षां थोडे अधिक मोठे व जास्त गुबगुबीत वाटले. काळेपणांतहि ते उजवे आहेत. म्हणजे मानेपाशीं देखील पांढुरका भाग नाहीं. काळे म्हणजे अगदीं काळे ! वर्फाच्या पांढऱ्या पार्श्वभूमीवर ते काळे कावळे चांगले उठून दिसत होते. तो घोडा व कावळे पाहून आम्ही मनोरंजन करून घेत होतो. टांगसे नदीनें आमची संगत सोडली होती व "पेंगांग" सरोवर आतां आमची साथ करीत होते. हें सरोवर म्हणे चांगले शंभर क्रोशार्ध लांब आहे. खारट पाण्याचें हें सरोवर आहे. पाणी खारट असो की गोड, दुरून तें सुंदरच दिसतें. ह्या तळ्याच्या कांठावर आम्हीं








कांहीं वेळ थांबलो. थांबणें भागच होतें. आडव्या आलेल्या ओहोळांत "जीप"चें चाक गोल गोल फिरूं लागलें. तें पुढें सरकेना. परंतु मैत्र महाशयांपाशीं यावर उपाय होता. सांखळदंड बांधून दुसऱ्या वाहनानें ह्या अडेल वाहनाला ओढून समोर नेलें व आमचा रोमहर्षक प्रवास पुन्हां सुरूं झाला. मैत्र महाशय युद्धाच्या कथा सांगत होते, जागा दाखवत होते. ह्या कहाण्यांच्या जोडीला "पांच मुखांनीं" आम्हींहि बोलत होतो. धक्के विसरण्यासाठीं कांहीं रचनात्मक कार्य करीत होतो. ह्या प्रवासांतील धक्के, धूळ, धाप व थंडी वजा करून महाराष्ट्र देशांतल्या लालचावलेल्या लेखक वाचकासाठीं, ह्या प्रवासाचें एक "गुलाबी" (कल्पना) चित्र काढून प्रसिद्ध करावं असा एक बूट निघाला. लागलीच तें चित्र रंगवावयास प्रारंभ झाला.

"एक सुंदर सकाळीं आम्ही लडाखमध्यें उतरलों." एक तोंड बोलले.

"तेव्हां मंद वारा सुटला होता." दुसरे तोंड बोलले.

"चहूं अंगानीं गुलाब व कमळें फुलली होती." तिसऱ्यानें वर्णनाचा धागा गुंफला.

"आम्ही उतरतांक्षणींच पांच लडाखी सुंदरी पंचारती घेऊन आम्हांला सामोऱ्या आल्या!" चवथें तोंड आपलें काम करूं लागले.

"पंचवीस लडाखी पुरुषांना दुःखसागरांत लोटून त्या आम्हांला सामोऱ्या आल्या!" पांचव्यानें लडाखमधील बहुपतिकरव जमेस धरून अचुक विधान केलें.

"आम्हांला सामोरा येण्यापूर्वी त्या सुंदरींनी फार महिन्यानंतर प्रथमच आज मंगल स्नानें केली होती." पहिलें तोंड.

"त्यांनीं कपडे पालटले होते, व केसांतील उवादेखील काढल्या होत्या." दुसरें तोंड.

"अशा त्या पांच लडाखी सुंदरी आम्हां पांच मराठी लेखकांना सामोऱ्या आल्या व त्यानीं आम्हांला पंचारती ओवाळली. पंचारती नंतर त्या व आम्ही............"

आणि मग पुढें हें "गुलाबी" प्रवासवर्णन भलतेंच रंगूं लागलें. प्रत्येकाची प्रतिभा मोकाट सुटली. थक्क करणाऱ्या कल्पना सुचूं लागल्या. पहातां पहातां 'आमचा लडाखी यक्षभूमीचा प्रवास' परमोच्च आनंदबिंदूपर्यंत जाऊन पोहोंचला. हंसतां हंसतां आमचीं पोटें दुखूं लागली. तेव्हां बोलले गेलेलें सारें अक्षर वाङ्मय येथें (किंवा कुठेंहि) देणें कठीण आहे. परंतु हा महाग्रंथ कधीं प्रकाशांत आलाच, तर ती एक अजोड कृति ठरण्यासारखी आहे. ह्या ग्रंथरचनेंत आम्ही गुंग असतांच "चुशूल" आलें.

अंधार पडला होता. आभाळांत चंद्र तरंगत होता. येथवर येऊन पोहोंचण्यास आम्हांस उणेपुरे आठ तास लागले होते. ज्या वाटेनें आम्ही आलो ती वाट मुळीं प्रवास करण्यासाठीं नव्हतींच, म्हणून लागलेल्या अवधीचें नवल वाटावयास नको. चुशूलचें नांव पूर्वप्रख्यात होतें. निसर्ग सौंदर्याच्या दृष्टीनें म्हणाल तर चुशूल अगदीं डावें होतें. आम्ही पाहिलेल्या सर्व स्थळांत डावे होतें. येथेंहि डोंगर होते, डोंगरांवर बर्फ होतें, पण प्रमाण चुकलें होतें. सामग्री तीच पण जुळणी बरोबर झाली नव्हती, सौंदर्य निर्माण झालें नव्हते. डोंगर पर्वतांसारखे ठेंगणे होते व दूर सरकून बसले होते. सभोंवार केवळ करडी ओसाडी पसरली होती. त्या ओसाडींतच दगड-विटांचीं कांहीं घरें होतीं. सामान उचलून लोळत लोंवत त्यापैकीं एका चाळवजा घरांत आम्ही प्रवेश केला. चुशूल—चुशूल म्हणतात, तें हेंच होते. येथें आपल्या सैनिकांनीं कडवा प्रतिकार केला होता. 'जिंकूं किंवा मरूं' अशा इर्षेनें तेथे लढले होते. हें स्थळ त्यांनी प्रख्यात केले होते. तेथेंच आतां आम्ही आलों होतों. बाहेर थंडी मी म्हणत होती, तहान भूक त्या थंडीनें जशी कांहीं गारठून गेली होती. झोंप मात्र आवरतां आवरत नव्हती आज आम्हीं तंबूंत नव्हे, तर दगड—मातीच्या खोलीत झोंपणार होतो. अंथरुण पसरून मी तत्काळ देह ताणून दिला. सला जराशी डुलकी लागली. मी डोळे उघडले तो कानेटकरांचें खाणें-पिणें व्यवस्थित चालूं असल्याचें दृश्य मला दिसले. एका शीख बंधूशीं ते गप्पा छाटीत होते. "काय चाललें आहे, नाटककार" 'मी उठून बसत त्यांना विचारलें' "कम्! Join us!" कानेटकर हंसून म्हणाले. मी कानेटकरांना "जॉईन" झालों तेव्हां माडगूळकर एकाद्या लहान बालकाप्रमाणें गाढ झोंपी गेले होते.

सकाळीं आम्ही उठलों तेव्हां वसंतराव कानेटकर चांगले बादलीभर गरम पाणी घेऊन तोंड धुवत होते. "आमची आठवण असूं द्या नाटककार!" मी त्यांना म्हणालों. व त्यांचाच घडा गिरविला. दाढी करण्याचा कांहीं प्रश्नच नव्हता. दाढी न करण्याची प्रतिज्ञाच आम्ही भोगली होती. ही प्रतिज्ञा माझ्या फार पथ्यावर पडली. कारण दाढी करण्याचा मला नेहमींच कंटाळा येतो. म्हणून न्याहारी केली. स्नान करण्याची इच्छा होती, पण स्नानासाठीं पुरेसें पाणीच नव्हतें. सर्वत्र गोठून बसलेलें बर्फ होतें; पण पाण्याचें नांव नाहीं. मला सकाळ-संध्याकाळ स्नान करण्याची संवय आहे. स्नान केलें नाहीं तर कसेसेंच वाटते. मनसोक्त चालणें व मनसोक्त स्नान झाल्यावर मला नवी पालवी फुटल्यासारखें वाटते. मनावरचें मळभ गळून जातें. गेल्या कांहीं दिवसांत मला (आम्हांपैकीं कुणालाच) स्नान घडलें नव्हतें. फार दिवस न झाडलेल्या घरासारखें मला वाटत होतें. कपड्यांवर व अंगावर धुळीचे थर जमले होते. थिजलेलें पाणी देहावर घेऊन बसलेल्या डोंगराकडे आवाशीपणें पहात मी माडगूळकरांना म्हणालो, "बुवा असें वाटतें कीं तें बर्फ खोदून आणावें, गरम करावे व त्या पाण्यानें चांगलें स्वच्छ स्नान करावे!"

"तुमचा उत्साह दांडगा आहे" माडगूळकर म्हणाले. "पण तुम्ही घरीं नाहीं, रणभूमीवर आहांत हें विसरूं नका!"

"घरीं नाहीं, रणभूमीवर!" आम्ही रणभूमीवर होतों खरेच! एक कडी निकडीचा संग्राम येथेंच लढला गेला. घरचे चोचले ह्या रणमैदानावर हवेत कशाला! रणमैदानाचें वेळापत्रक वेगळें, पद्धती वेगळ्या! स्नान, दाढी व स्वच्छतेच्या अन्य कल्पनांना येथें थारा नव्हता. लढणारे सैनिक दिवसचे दिवस चिखलानें भरलेल्या खंदकांत घालवीत. उनपाऊस अंगावर घेत. पेंगणारे मस्तक कुठल्याहि दगडावर टेकीत. त्यांना स्नान घडे तें धुळीचें व घामाचें. भुके पोटीं रक्तानें माखलेला भाकरीचा तुकडा जेमतेम पुसून त्यांनीं तोंडांत घातल्याचे उल्लेखहि मी वाचले होते. अनेक युद्धकथा मला आठवत होत्या. "मला भाऊसाहेबांची बखर" आठवत होती. हेमाशेंचे "ऑल क्वाएट ऑफ द् वेस्टर्न फ्रंट" व "रोड बॅक" आठवत होते. त्या आठवणी काढतच मी इतस्ततः पहात होतो. पुन्हा

( पृष्ठ ६२ वर पहा )


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



# हे विश्वा- आश्चर्यांकिता!

—सुरेश वेंगुर्लेकर



**कांहींतरी** सुंदर पहावं हा माझ्या जीवाचा सततचा ध्यास आहे. सुंदर कांहीं दिसलं नाहीं कीं माझा जीव तगमगूं लागतो. दिसेनासंच झालं कीं, अगदीं कासावीस होतो. आणि ते दिसलं कीं माझा आनंद कुठेंहि न मावणारा होतो. आनंदानं सुखानं मी हरखून जातो. मी खिदळतो. मी चित्कारतो. लहान मुलांप्रमाणं कांहींहि करतो.

सौंदर्य मी पाहिलं आहे. खूप पाहिलं आहे. सुंदर बायका मी पाहिल्या आहेत. सुंदर मुलं मी पाहिली आहेत. सुंदर म्हातारे मी पाहिले आहेत. सुंदर देखावे पाहिले आहेत—चित्रांतले आणि खरे. किती किती पाहिले आहेत. पुष्कळ पुष्कळ पाहिले आहेत. ते भुरभुरणारं जावळ· दांत नसलेल्या इवल्या पोकळींतून सांडणारं हास्याचं शुभ्र दूध. गोड गोंड पापे देणारे गुबगुबीत गाल. गुटगुटीत अवयव. इवलाले हातपाय मी पाहिले आहेत. आणि त्या इवलाल्या सौंदर्याला जन्म देणारं सौंदर्यंहि मी पाहिलं आहे. चाफेकळी नाक मी पाहिलं आहे. हरणाचे डोळे मी पाहिले आहेत. सफरचंदाचे गाल मी पाहिले आहेत. पिकलेल्या तोंडल्याचे ओठ मी·पाहिले आहेत. चिंचोळी नाजुक हनुवटी मी पाहिली आहे....तिच्यावरच्या काळ्या तिळासकट. काळा केशसंभार... आणि पांढरा केशसंभारसुद्धां मी पाहिला आहे. पांढरा केशसंभार. केसांची पांढरी झुलपं. हनुवटीवरची पांढरी दाढी. झऱ्याच्या सांडणाऱ्या शुभ्र धारांसारखी. आणि मी पाहिली आहे लाजणारी सकाळ-संध्या. त्यांना लाजवणारा नारायण सुद्धां. त्यांना लाजवून मग जगावर सोन्याचा वर्ख ओतणारा नारायण. आणि रजनीला चंदेरी मुलामा देणारा चंद्रहि मी पाहिला आहे. त्याची प्रत्येक सुंदर कोर मी पाहिली आहे. पृथ्वीवर सांडलेली चांदण्याची सुंदर साय मी पाहिली आहे. असं किती किती सुंदर सुंदर मी पाहिलं आहे.

पण आतां मी पाहिली एक पोकळी. सुंदर पोकळी. किती पण सुंदर ! पृथ्वीच्या पाठीवर सात समुद्र आहेत. या सातहि समुद्रांच्या किनाऱ्यावर किती किती सुंदर दृश्यं आहेत. किती चित्रकारांनीं ती चितारली आहेत. किती चित्रकार ती चितारताहेत. किती चित्रकार ती चितारणार आहेत. पण त्या सातांपैकीं एका समुद्रकिनाऱ्यावर असलेली ही सुंदर पोकळी अजून कुणा चित्रकारानें पाहिलेली नसेल. नाहींच पाहिलेली. पाहिली असती तर तिच्या सौदर्यानें तो तेव्हांच वेडा झाला

अनुक्रमणिका

सौंदर्याचा मला ध्यास आहे. त्या ध्यासापोटीं घडलेला
हा सजीव, सचेतन, भारून टाकणारा साक्षात्कार !
त्या साक्षात्काराला शब्दांच्या कवेंत पकडण्याची
एक आगळी धडपड !

असता. रंगांच्या किमयेनें त्यानें ती केव्हांच कागदावर आणली असती. ती कृति अमर झाली असती. तो अमर झाला असता.

झाला असता. पण झालेला नाहीं. या वेळीं ती सुंदर पोकळी केवळ मीच पाहिली आहे. तिच्या सौंदर्यानें मीच वेडा झालो आहे. किती सुंदर ! किती किती सुंदर...! भोंवतालीं काळा काळा कातळ आणि आंत पांढरी पिवळी पुळण. किनाऱ्यावर वाळू थोडी कां पसरली आहे ? कातळहि आहेतच कुठें कुठें. पण ही पोकळी बनविणारा कातळ कांहीं निराळाच आहे. तो काळा आहे, पण कोळशासारखा काळा नाहीं. त्याला गडद निळी झांक आहे. ते त्याच्या काळचा रंगाचं आगळंच तेज आहे. गौर-काय युवतीच्या दंडावर रुतलेल्या चोळीच्या कांठासारख्या या कात-ळाच्या कडा वाळूंत रुतल्या आहेत. त्या काळचा निळचा पोकळींत सांठ-लेली ती वाळू....ती वाळू नाहीं. तो आहे मोत्यांचा भुगा. मोत्यांचा भुगा एकटक पहातो आहे भोंवतालच्या काळचा कातळाकडे. काळा निळा कातळ पहात राहिला आहे...बांधल्या नजरेनं त्या मोत्यांच्या भुग्या-कडे. आणि या पहाण्यानं या पोकळींत एक आगळंच तेज झळाळतं आहे.

या तेजानं मी दिपलो आहे. मोह अनावर झाला आहे. वारा या पोक-ळींत शिरतो आहे...मोत्यांचा तो भुगा न राहवून काळचा–निळचा कातळाला बिगलतो आहे. झोंबतो आहे...मग मलाहि राहवत नाहीं. मीहि आवेगानें त्या कातळाला समीप होतो. मीहि त्या कातळाला स्पर्श करतो. इथं...तिथं. जागोजाग. त्या कातळाला बोटांनीं स्पर्श करून मला सुख मिळतं. आणि मग आणखी...आणखी सुख मला हवं होतं. लांब-लांब हात पसरून मी तो कातळ कवटाळतो. सारं शरीर त्यावर झोंकून देतो. शरीराच्या प्रत्येक कणानं कातळाच्या कणा कणाला मी स्पर्श करतो. मी सुखावतो. मी बेभान होतो. त्या कातळाची एकसारखी चुंबनंच घेत रहातो. आवेगानं कातळावर मी ओंठ दाबतो–आणि जोरानें श्वास घेतो. आणि मला कळतं या कातळाला सुगंध आहे. या सुगंधानं ही सारी पोकळी भारून गेली आहे. मी वेगानं श्वासोच्छ्वास करतो. तो सुगंध मी खूप खूप पितो. आणि मी वेडा होतो. त्या मोत्यांच्या भुग्यांत मी नाचूं लागतो. मी खूप नाचतो. मग एकदम थांबतो. खालीं वांकतो. दोन्हीं मुठी भरून तो भुगा मी घेतो. गर्रर्रकन् गिरकी घेतो आणि मुठींतला सारा भुगा कातळावर भिरकावून देतो. आणि मग मीहि भिर-कावून दिल्यासारखा त्या भुग्यांत कुठेंतरी पडतो. त्या सुखानं मला धाप लागते. मी दमतो. मी डोळे मिटतो. पण डोळे मिटले तरी मी पुनः पुनः गिरक्या घेतच रहातो. मोत्यांचा भुगा कातळावर भिरकावतच रहातो. कातळाचा सुगंध पीतच रहातो.

त्या गंधाची मला नशा चढते आहे. आणि मला तूं दिसते आहेस. त्या पोकळींत तूं नसतांनाहि मला तूं दिसते आहेस. आणि या वेळीं मला तूं फार फार हवीशी वाटत आहेस. होय, तूं इथं हवीच आहेस. खरंच हवी आहेस. ही काळचा-निळचा कातळाची सुंदर पोकळी इथं आहे आणि तूं मात्र इथं नाहींस. तुझ्या अभावानं या पोकळींतहि मला पोकळी भासते आहे. इतक्या सुंदर पोकळींत तूं नसावीस हें कससंच आहे. चुकीचं आहे. अगदीं चुकीचं आहे...

तलम निळं निळं वस्त्र तूं नेसली आहेस. तसलीच कसली तरी चोळी तूं घातली आहेस ज्यांतून तुझी कांचोळी स्पष्ट आकारते आहे. आणि त्या कांचोळींत जे तूं लपवून ठेवूनहि तिनें ते दाखवलं आहे. स्पष्ट नाहीं तरी अस्पष्टसं. अगदीं अंग नाहीं तरी आकार दाखवला आहे. तुझी वस्त्रंच मोठी लबाड आहेत. ती तुझं सारं अंग झांकूनहि तुझा सारा आकार दाखवताहेत. तुझा सारा आकार...कुठं गोल असलेला.... कुठं दीर्घ झालेला...कुठं छान सुंदर रुंदावलेला ... भरलेला आकार. डौलदार आकार.

हा तुझा आकार मला भूल पाडतो आहे. हा आकार मला अधिका-धिक स्पष्ट पहावसं वाटूं लागलंय्. फार वाटूं लागलंय्. मला राहवत नाहीं. मी तुझा हात धरून धांवत सुटलो आहे. तिकडे...तिकडे...पाण्या-कडे. ज्या लाटा तुला मिठी मारायला धांवून येताहेत तिकडे. तुला पाहून त्या लाटा धांवून येताहेत आणि तुला ओढून त्या लाटांकडे मी धांवत सुटलो आहे...

ही धांव संपली आहे. आणि तूं चिंब ओली झाली आहेस. ओलेती झाली आहेस. थेंबा थेंबांनीं डंवरली आहेस. निथळते आहेस. तुझी वस्त्रं-तलम वस्त्रं अंगा अंगाला विलगली आहेत. झोंबली आहेत. मूळच्या तुझ्या वस्त्रांचा रंग आहे निळा निळा. पण तो निळा रंग नाहींसा होऊं लागला आहे. जिथं जिथं तें वस्त्र तुझ्या अंगाला विलगलं आहे तिथं तिथं त्या वस्त्रानें तुझ्या अंगाचा रंग चोरला आहे. निळचा रंगांतून गुलाबी रंग जागोजाग खुलतो आहे. आणि त्या खुलणाऱ्या गुलाबी रंगाभोंवतीं उगाचंच त्या वस्त्राचे ओले निळे पट्टे उरले आहेत. उगाचच उरले आहेत. पण तेहि सुंदर दिसताहेत. तूं सारीच कशी सुंदर दिसते आहेस. निळी-निळी... गुलाबी-गुलाबी... ओली ओली. आणि हे निळं-गुलाबी ओलं सौंदर्य उचलून पुन्हां एकदम मी धांवत सुटलो आहे... तिकडे... त्या सुंदर पोकळीकडे.

या सुंदर पोकळींत तूं नव्हतीस हें किती वेडेपणाचं होतं. आतां तूं इथं आहेस हे किती सुंदर आहे. खरंच किती सुंदर आहे. तुझ्या चिंब चिंब अंगावरून त्या मोत्यांच्या भुग्यांत आणखी मोती सांडताहेत. तुझी पावलं त्या भुग्यांत रुतली आहेत. डाव्या पायाला गुडघ्यांत किंचित् बांक देऊन तूं उभी आहेस. तो बांक किती सुंदर आहे. डाव्या पायाला असा सुंदर बाक देऊन पलिकडच्या उजव्या पायावर सारं शरीर तोलून तूं जी उभी आहेस – तें तुझं उभं राहणंच मोठं विलोभनीय आहे. तुझ्या ओल्या वस्त्रांनीं तुझा आकार आधींच स्पष्ट केला आहे...पण आतांच्या तुझ्या उभं राहण्यानं तो स्पष्ट आकार आणखी स्पष्ट झाला आहे. रेखीव झाला आहे. तुझं भरलेलं शरीर जागोजाग वळलेल्या, कोन केलेल्या, कमानी झालेल्या रेषांनीं कितीपण सुंदर कोरलं आहे.

तुझ्या शरीरावर इतकं सुरेख कोरीव काम करणाऱ्या साऱ्याच रेषांना सौंदर्याची धार आहे. पण त्या साऱ्याच दिसत नाहींत. कारण तुझ्या अंगावर उरलेल्या त्या वस्त्राच्या निळ्या पडद्यांआड त्यांतल्या कांहीं रेषा लपल्या आहेत...

आणि कांहीं रेषा तूंच लपवते आहेस. दोन्हीं हातांनीं झांकून ठेवते आहेस. त्या खरोखरच आपल्याला लपवितां आल्यां आहेत कां म्हणून अधोमुख होऊन पहाते आहेस. माझ्याकडे बिलकुल न पहातां ओलीचिंब झालेल्या तुला मी पहातो आहे–हे तूं पहाते आहेस. आणि तशीच उभीच्या उभी तूं थरारते आहेस. तुझ्या अंगा-अंगावरच्या साऱ्या रेषाहि थरथरताहेत. मग मीहि थरारतो आहे. तुझ्या देहावर उगीचच उरलेले ते निळे पट्टेहि आतां मला सहन होत नाहींत. आणि तूं जें लपवून ठेवते आहेस तें मी शोधून पहावं म्हणूनच तूं लपवून ठेवते आहेस असंच मला वाटूं लागलं आहे. पण मी ते शोधणारच आहे. इथं मी तुला कांहीं लपवूं देणार नाहीं. या अशा सुंदर पोकळींत तुझं कांहीं सौंदर्य लपलेलं असावं हे वेडेपणाचंच आहे. अग तुझ्या देहाच्या कणाकणाच्या सौंदर्यानें ही सुंदर पोकळी मी भरून टाकणार नाहे... पूर्ण करणार आहे...

ही सुंदर पोकळी मी अशी पूर्ण करणार आहे...मग ही चोळी अजून तिथं कशाला आहे–? ते निळे निळे पट्टे अजून तिथं कशाला आहेत..? आतां हे सहन होणं केवळ अशक्य आहे. ते अशक्य आहे म्हणूनच मी तुला जवळ ओढलं आहे. माझ्या पुरुषी बाहूंत तुला दटावलं आहे. आणि तुझ्या चोळीची गांठ माझ्या कुशल बोटांनीं केहांच मोकळी केली आहे. गांठ मोकळी केली आहे आणि अंगावरची चोळी दूर झाली आहे...

पण मी रानटीपणा केलेला नाहीं. तुझी चोळी दूर करून माझ्या बाहूंतूनहि मी तुला मोकळी केली आहे. तुला मी मोकळी केली आहे म्हणूनच तूं मनापासून नाहीं–उगाचंच घाईनं दूर झाली आहेस. तूं दूर झाली आहेस...पण तुझ्या ओल्या वस्त्राचा पदर माझ्या हातांत आहे.




सर्रर्कन् मी तो ओढला आहे. कळत-नकळतच तुला एक गिरकी घ्यावी लागली आहे. आणि या गिरकीचा वेग तूं वाढवला आहेस...तोंडानें तूंच नको नको म्हणते आहेस...आणि तूंच विवस्त्र होते आहेस. गिरकीच्या वाढलेल्या वेगाबरोबर अंगावरची उपवस्त्रहि तूं उधळली आहेस...

ही गिरकी संपवून तूं स्थिरावते आहेस...नाहीं तुझा तोल जातोच आहे. आणि तो जाणारा तोल मी सांवरावा म्हणून तूंहि खुशाल जाऊं देते आहेस. माझ्या दोन्हीं पंजांत तुझे बाहू झेलून त्या झुकलेल्या तोलाची गति किंचित् माझ्या दिशेनें ओढून मग तुझ्या देहाला मी एक अलगद झोंका दिला आहे...अलगद आणि हळुवार झोंका आणि त्या झोंक्यानं कशी हळूंच तुला त्या निळ्या काळ्या कातळावर पसरून दिली आहे. कातळाच्या कठीण स्पर्शानं सुखावून जाऊन तूंहि आतां निःसंकोच पसरली आहेस. उघड्या देहाला होणाऱ्या त्या कणखर स्पर्शानं तूं भान हरवून बसली आहेस. कांहीं लपवणं ही गोष्ट आतां तूं विसरूनच गेली आहेस.

एक पाय तूं सरळ दीर्घ सोडला आहेस. दुसरा किंचित् दुमडून घेतला आहेस. तुझ्या पावलांची नाजुक बोटं कातळाच्या कणखरपणाशीं चाळा करताहेत. तुझ्या हातांची बोटंहि कातळाच्या अंगाअंगावरून फिरताहेत. आणि त्या स्पर्शानें सारा कातळ जिवंत झाला आहे. तुझ्या गौर-गुलाबी शरीरांत जागोजाग शिरतो आहे. तुझा आकार सांगणाऱ्या रेषा चुळ-बुळणाऱ्या बोटांमुळें पावलांशीं जरी चंचल झाल्या आहेत तरी वर सरकतांना मात्र तो चंचलपणा विसरून अगदीं आंठवणीनं त्या रुंदावतच गेल्या आहेत. वर सरकून या रेषांनीं पहिलं वळण घेतलं आहे तुझ्या भरलेल्या टचटचीत पोटरीपाशीं. आणि तूं पाय किंचित् ज्या गुडघ्याशीं दुमडला आहेस तिथं एक सुंदर वेलांटी घेऊन, डोंगरावरून खालीं धांव-तांना रुंदावत गेलेल्या नदीच्या कांठासारख्या त्या पुन्हां खालीं रुंद रुंद झाल्या आहेत. हा दुमडलेला गौरपाय जर तूं सरळ केलास तर तुझ्या कटीपासून खालीं पहातांना कुणा अजब कारागिरानें हस्तिदंताचा तंबोरा करून या कातळावर ठेवल्याचाच भास होणार आहे. आणि कातळाच्या या काळ्या-निळ्या पार्श्वभूमीवर तुझ्या कटी प्रदेशाचं नाजुक वळण आतां एकाच रेषेनें असं मोहक कोरलं आहे...विलक्षण मोहक. पण पुढें ती रेषा तुझ्या दीर्घ हस्ताच्या आकारानें अडवली आहे. आणि तुझ्या शरीराशीं बांधलेली माझी नजर तुझ्या गरगरीत दीर्घ हस्तावरून धांवत क्षणभर थांबली आहे. ह्या हस्ताच्या अंगुलीचा कातळाशीं चाललेला शृंगार पहात ती नाजुक मऊ मऊ बोटं त्या कातळाला आवेगानें असा कांहीं स्पर्श करीत राहिली आहेत – कीं जणुं आपला सारा कोमलपणा त्या कातळाला देऊन त्याचा सारा कणखरपणा तीं आपल्याला घेणार आहेत.

इतका सुंदर शृंगार कधीं कुणी पाहिला आहे ? तो केवळ मीच पहातो आहे. एकटा मीच ! पण मी पाहूं तरी किती आणि काय काय ? माझी नजर तुझ्या अंगावरून धांव लागली तरी धांवतेच आहे...

किती पण सुंदर आहे ती तुझ्या खांद्याची गोलाई. आणि ती आरक्त कर्णांची पाकळी..त्या केसांच्या काळ्याशार रेषा.. डोळ्यांचे भुंगे.. भुंवयांच्या कमानी..नासिकेची दीर्घ धार.. ओठांची पखरण.. ती नाजुक




जिव्हणी....ती गळयाची गौराई....कंठाखालच्या खळग्यांतील मोहक सोनेरी छाया.. आणि ...आणि तुझ्या देहावर उगवलेले ते दोन पूर्ण चंद्र. चंद्र..? नाहीं नाहीं ते चंद्र नाहींत. चंद्र दोन कसे असतील ? आणि त्या इवलाल्या गडद चोंचीच सांगताहेत—ते चंद्र नाहींत, ते आहेत इवलाल्या काळया चोचींचे दोन गुबगुबीत पक्षी. आणि चंद्रहि आहे— तो विसावला आहे तुझ्या वदनावर.

पण हें काय ? मी नुसताच कातळाला टेकून पडलो आहे आणि समोर तूं मुळीं नाहींसच. अगदीं उघडया डोळयांनीं मी पहातो आहे कातळावर पसरलेली तूं नाहींसच. या सुंदर पोकळींत तूं मुळीं कुठेंच नाहींस. एकटाच मी आहे. ही पांढरी-पिवळी पुळणहि एकटीच आहे. हा निळा-काळा कातळहि एकटाच आहे. तर मग तूं इथं होतीस हें केवळ स्वप्न आहे.. ? तूं...तिथं समोर त्या कातळावर पसरलेली पूर्ण विवस्त्र तूं... हें केवळ स्वप्न आहे ? मिटल्या डोळयांनीं मी ते पाहिलं पण आतां उघडया डोळयांनीं तें कसं पाहूं ?

नाहीं नाहीं हे सारें सौंदर्य सत्य असतांना तुझं इथलं अस्तित्व केवळ स्वप्नवत् नको आहे. तुझं इथें असणं हेंहि सत्यच असायला हवं. हो असायलाच हवं. नाहींतर ही सुंदर पोकळी अशीच कां अपूर्ण ठेवायची ? नाहीं, तुझ्या सौंदर्याचा पूर्णविराम इथं हवाच आहे.

त्या निळया-काळया कातळावर तश्शी... पूर्ण विवस्त्र ओल्या अंगानं निःसंकोच पसरलेली तूं... आणि मगच हें सौंदर्य पूर्ण होणार आहे. मी तें पूर्ण करणार आहे. अगदीं विलंब न करतां आतां पूर्ण करणार आहे. वाळूच्या कणाकणाला मी सांगतो आहे...

'मी आत्तां येतो... आत्तां येतो...तिला घेऊन. ओली ओलेती घेऊन.'

* * *

आणि आतां मी तुझ्या दारांत उभा आहे. अगदीं तुझ्या दारांत. नुसतं हे दार मी ठोठावणार आहे...मग ते उघडणार आहे... आणि माझ्या समोर तूं उभी असणार आहेस...

मी दार ठोठावतो आहे...कुणाची तरी पावलं वाजताहेत... खीळ निघते आहे... दार उघडतं आहे... आणि हें काय ? तुझी आई कशाला समोर उभी आहे ? हंसून म्हणते आहे—

'या –'

पण तूं कुठें आहेस ? आंत असशील कुठेंतरी...येशील धांवत बाहेर ...आणि तशीच धांवत नेईन तुला...

पण...पण तुझी आई सांगतेय... तूं घरांत नाहींस...

वेड तर नाहीं लागलं तुझ्या आईला ? खुशाल पुन्हां सांगते आहे त्या चित्रकाराबरोबर तूं गेली आहेस... मॉडेल म्हणून बसायला.

तूं समोर बसणार आसेस आणि तो तुझं सुंदर चित्र काढणार आहे. मोठंच सुंदर चित्र ! आणि मी इथं कशाला आलो आहे ? तुझीं चुंबनं घ्यायला ? अग—त्याचं कागदावर काढलेलं तें सौंदर्य टर्रकन् कागद फाडला कीं संपेल... तें कागदी आहे. खोटं आहे नश्वर आहे. पण त्या पोकळींत तूं असणं... तश्शी... ओलेती... विवस्त्र...कातळावर पसरलेली तूं... हेंच खरं सौंदर्य आहे. जिवंत सौंदर्य असणार आहे... जगांतलं सर्वात मोठं सौंदर्य... पण तूं गेली आहेस —त्या चित्रकारासमोर बसायला.

मग तें सौंदर्य तसं अपूर्णच रहाणार आहे ? ती सुंदर पोकळी...तुला घेऊन आत्तां येतो म्हणून सांगून आलो मी तिला आणि...नाहीं, नाहीं. यावेळीं त्या चित्रकारासमोर बसूं देणार नाहीं मी तुला. नाहीं बसूं देणार. त्याच्या पुढयांतून ओढून नेईन मी तुला... होय ओढून नेईन मी तुला..

तुझी आई पुन्हां आग्रहानें म्हणते आहे—

'बसा ना !'

आणि धाडकन् दार उघडून मी धांवत सुटलो आहे. तिथं बसायला मला वेळ नाहीं. मी तुला नेणार आहे तिकडे... त्या सुंदर पोकळींत. त्या चित्रकाराच्या पुढयांतून ओढून.

साऱ्या शक्तिनिशी मी त्या चित्रकाराच्या चित्रशाळेकडे धांवतो आहे...पायांतली शक्ति वेडया वेगानें उधळत चित्रशाळेकडे मी धांवतो आहे... आणि एकदांचा तिथें पोहोंचून त्याच्या दारावर जोरजोरानें मी धक्के देतो आहे...

'कौन हैं –?"

त्याचा नोकर किंचाळून विचारतो आहे...आणि खाड्कन दार उघडतो आहे. दार उघडतांच त्या 'आदमीला' दूर ढकलून मी आंत शिरलो आहे. आणि त्याच पळतीनं पुढची दोन दालनं ओलांडून मी आंत शिरणार आहे.. जिथं तो चित्रकार तुला विषय बनवून चित्र उतरण्यांत दंग झाला आहे... जिथं त्याच्यासमोर तुझ्या रूपानं त्याला दंग करणारं सौंदर्य डंवरलं आहे... तिथं मी शिरणार आहे...

धाडकन् त्या दालनाचं दार मी ढकललं आहे. पण—पण तिथं तो चित्रकार नाहीं आणि तूंहि नाहींस. यापूर्वी त्यानं काढलेली कितीक चित्रं



अनुक्रमणिका

मात्र भिंतीवरनं हंसताहेत. आणि त्याचा नोकर माझ्या मागें येऊन पुन्हां किंचाळतो आहे—

"बाबुजी बाहर गये है। आऊट—औैर कामके वासते."

मूर्ख, मूर्ख आहे हा नौकर. तुझी आई... तो चित्रकार... आणि तूं सुद्धां. आतां मी कुठं धांवूं ? धांवायची शक्तीहि उरली नाहीं. ठिकाणहि ठरलं नाहीं. आतां मी कुठं जाऊं ? ...कुठें आहेस तूं ?... आत्तां तुला घेऊन येतो म्हणून सांगून आलो मी त्या सुंदर पोकळीला...आणि कुठें आहेस तूं ?

धांवायला बिलकुल अडथळा न करणारी पक्की सडक पायांखालीं आहे. पण मी धांवत नाहीं. कशाला धांवूं ? तुला मी आणूं शकलो नाहीं हें त्या सुंदर पोकळीला सांगायला कां मी धांवूं ? पोहोंचेन तिथं सवडीनें असाच चालत पोहोंचेन तेव्हां. आणि मग सांगेन तिला...उघड्या डोळ्यांनीं तिचं अपूर्ण सौंदर्य पहात, मी तुला आणूं शकलों नाहीं म्हणून.

* * *

मी चालतो आहे. किती तरी वेळ मी चालतो आहे.धांवण्याची नाहींच पण चालण्याची शक्तीहि संपत आली आहे आणि तरीहि मी चालतो आहे. पक्की सडक संपली आहे. पायाखालीं वाळू आली आहे. मी चालतो आहे. पावलं वाळूंत रूततांहेत ती बाहेर ओढून... पुनः पुढें टाकत मी चालतो आहे... पाय लटपटताहेत पण मी पडत नाहीं. मी तसाच चालतो आहे.. चालतो आहे. मघां धांवतांना मी पडलो तेव्हां पुनः उठलो होतो. आतां चालतांना मी पडलो तर मी उठणार नाहीं. पण मी पडत नाहीं. मी चालतो आहे. या चालण्यानं धांप लागून त्या सुंदर पोकळीपाशीं मीं पोहोंचलो आहे. आतां मी तिला सांगणार आहे... मी तुला.

नाहीं...नाहीं. मी तुला आणलेलं नाहीं. आणि तरीहि तूं या पोकळींत आहेस. ही सुंदर पोकळी अपूर्ण नाहीं. तूं इथं आहेस आणि ही पूर्ण झाली आहे. खरंच तूं आहेस. हें स्वप्न नाहीं. सत्य आहे. तूंच तिथं आहेस. तो काय तो चित्रकार तिथं आंत बसला आहे. तो दंग झाला आहे... रंगारंगानं तुझ्या सौंदर्याचं अंगन्-अंग कागदावर उतरविण्यांत. तूं कातळावरच आहेस. जिथं मी तुला स्वप्नवत् पाहिली होती तिथंच तूं आहेस. स्वप्नवत् नाहीं. खरी खरी तूं..

पण हे काय ? तूं ओलेती नाहींस... अंगाअंगानें भिजलेली नाहींस... निथळत असलेली तूं नाहींस... तूं विवस्त्र नाहींस... त्या कातळावर निःसंकोच पसरलेली तूं नाहींस... तुझ्या सौष्ठवाच्या रेषान् रेषा दर्शवीत कातळावर पसरलेली तूं नाहींस... आणि तरीहि तूं सुंदर दिसते आहेस. खरंच तरीहि तूं सुंदर दिसते आहेस. मघां मी तुला सुंदर म्हणून 'तश्शी' पाहिली. पण आतां तूं तशी नसतांनाहि सुंदर दिसते आहेस. वाटत आहे कीं आतां तर तूं मघांपेक्षांहि सुंदर दिसते आहेस. जणूं पृथ्वीवरचं सारं सौंदर्य या क्षणीं इथं या पोकळींत तरळतं आहे. आश्चर्य करण्याइतकी तूं सुंदर दिसते आहेस. ती तूंच आहेस... तूंच आहेस. पण 'तूं' म्हणून आजपर्यंत जे जे मी पाहिलं तें तूं नाहींस. तूं आतां आगळीच भासते आहेस. अगदीं वेगळीच दिसते आहेस.

तिथंच तूं आहेस. त्या सुंदर पोकळींत. निळ्या-काळ्या कातळावर. पण पसरलेली नाहींस. गुडघ्याभोंवतीं दोन्हीं हातांच्या बोटांची जुळणी अडकवून. मागें झोंकलेला तोल सांवरत तूं बसली आहेस. तुझा तोल जातांना मी मघां पाहिली. तूं खुशाल जाऊं दिलेला पाहिला. पण आतां तूं जी अशी तोल सांवरून बसली आहेस तीच तूं कितीतरी सुंदर दिसते आहेस. खरंच हें तुझं तोल सांवरणं मोठं मोहक आहे. तुझे दीर्घ पाय गुडघ्यांतल्या दुडणीनं तूं सांवरून घेतले आहेस. तुझ्या पायांचं दीर्घत्व तुझ्या सौष्ठवाचं मोठंच भूषण आहे. पण म्हणून ते दीर्घ पाय खुशाल लांब सोडून त्या भूषणाचं प्रदर्शन न मांडतां, गुडघ्यांतल्या दुडणीनें त्या दीर्घत्वाला तूं जी मर्यादा घातली आहेस... या मर्यादेतलं सौंदर्य मोठंच विलोभनीय आहे. पण अजूनहि तुझ्या सौष्ठवांतल्या दीर्घत्वाचा साक्षात्कार घडतोच आहे. तुझ्या भरलेल्या शरीराचा मागें झुकलेला तोल सांवरतांना तुझ्या दीर्घ हातांना पडलेला ताण — या सौंदर्याचा साक्षात्कार घडवतो आहे. या तोल सांवरण्याच्या कृतींत तुझ्या हातांची नाजुक कोमल बोटंहि विलक्षण मग्न होऊन एकमेकांना बिलगली आहेत. तुझे दीर्घ पाय सांवरून तूं बसली आहेस. पण या सांवरलेल्या पायांभोंवतीं हातांची जुळणी अडकवून तुझे दीर्घ हात मात्र तूं खुशाल ताणले आहेस.. तुझ्या भरलेल्या शरीराचा तोल तसाच मागें झोंकला आहेस... पण पार जाऊं दिलेला नाहींस. तूंच मागें झोंकलेला तोल तूंच पुनः सांवरला आहेस. मर्यादांचा आणि मोकळेपणाचा मोठाच मनोहर मिलाफ या तुझ्या बैठकींत साधला आहेस... खरंच... खरंच तुझी ही सारी बैठकच कांहीं विलक्षण सुंदर आहे.

आणि तूं ही जी अशी सुंदर बैठक साधून बसली आहेस ती तूं विवस्त्र नाहींस... तूं अवगुंठित आहेस. आणि तुझी ही वस्त्रं ओलीहि नाहींत.







तुझ्या अंगा अंगाला विलगलेली नाहींत...झोंबलेली नाहींत. ती पूर्ण कोरडी आहेत. आणि तरीहि या कोरडया वस्त्रांतली तूं मघापेक्षांहि कमनीय दिसते आहेस...

शुभ्र सकच्छ वस्त्र तूं नेसली आहेस. हिरवी गहिरी चोळी तूं ल्याली आहेस... या वस्त्रांनीं तुला कशी छान झांकली आहे. उघडी आहे ती केवळ मान... तुझा तेवढा चेहरा... कोपरापासूनचे ते पुढचे हात आणि ती गोरी गोमटी नाजुक पावलं. या शुभ्र कोरडया वस्त्रांनीं तुझं सारं सौष्ठव कसं अलगद आलेपलं आहे... तुझ्या शरीराची गौराई या शुभ्र वस्त्रांतूनहि हळूंच कशी डोकावते आहे...पण असं अगदीं हळूंच डोकावतां-नाहि ती लाजेनं अगदीं गुलाबी गुलाबी होते आहे... तुझ्या कांतीचं हे असं मर्यादेनं डोकावणं आणि पुन्हां लज्जेनें लाल गुलाबी होणं वेड लावणारं आहे... अगदीं वेडं करणारं आहे... सारी पोकळी तुझ्या या सौंदार्यानें भारावली आहे. या तुझ्या कांतीकडे पहातांना त्या मोत्यांच्या भुंग्याला आपल्या मोतीया रंगाच्या गर्वाची विस्मृति होते आहे... सारा कातळ अजूनहि आपल्या निळ्या-काळ्या तेजानें झळाळतो आहे... पण त्या तेजाची धुंदी आतां त्याला उरलेली नाहीं. तुझ्या नाजुक कोमल पावलांना कातळाच्या अंगानं कसा नम्र हळुवार आधार दिला आहे. कां कातळाला तुझ्या नाजुक पावलांचाहि भार होऊं नये म्हणून तूंच ती तशी अलगद टेकली आहेस ? तशा अलगद टेकण्यानं सुद्धां तुझ्या पावलांची तिथली कांति आरक्त झाली- आहे. पावलांपासून वर त्या शुभ्र वस्त्राचं आवरण सुरू झालं आहे... तुझं सारं सौंदर्य हळुवारपणें झांकूनच तें खुलविण्याची किमया आपल्याला किती कलापूर्ण साधली आहे हे सांगण्यासाठीं त्या वस्त्राचे कांठ या तुझ्या पावलांच्या मागें किंचित वर ऐकमेकांत मिसळले आहेत. या मिलनांत... आणि या मीलनाच्या कुजबुजण्यांत तुझ्या आतांच्या सौंदर्याच्या श्रेष्ठत्वाचा शब्द कळत नकळत उमटतो आहे. या एकमेकांत मिसळलेल्या कांठांकडूनच वर वर साऱ्या तुझ्या शरीरभर, तुझ्या सौष्ठवानुरूप त्या वस्त्राच्या चुण्यांची वेडीवांकडी आणि तरीहि सुंदर वेलबुट्टी पसरली आहे... त्या शुभ्र वस्त्राला जागोजाग पडलेल्या या चुण्यांत वृक्षाला बिलगणाऱ्या वेलींचा लाडिकपणा आहे... तुझं शरीर झांकूनच तुझं सौंदर्य खुलवतांना तुझ्या अवगुंठित सौंदर्याच्या श्रेष्ठत्वाचा साक्षात्कार घडवतांना या शुभ्र वस्त्रांच्या चुण्यांनीं जशी नाजुक कसरत केली आहे..तसंच तुझ्या सौष्ठवाभोंवतीं लपेटलेल्या त्या वस्त्रानें तुझ्या ओटीपोटापाशीं सुंदर निरकेळ निर्माण करून स्वतंत्र सौष्ठव साधलं आहे. तुझ्या वस्त्राच्या निरकेळाचं हें ठसठशीत सौंदर्य मोठं मोहक आहे. तुझ्या सौंदर्यात भर घालणाऱ्या शुभ्र वस्त्राच्या त्या मोहक चुण्यांनीं सुद्धां निरकेळाच्या त्या सौष्ठवाला मोहून तिथंच सारी गर्दी केली आहे. आणि तुझ्या पदरालाहि या निरकेळाचं सौष्ठव झांकण्याचं भान पूर्ण राहिलेलं नाहीं. मात्र तुझ्या कटी प्रदेशापासूनचं सारं अंग या पदरानं कसं छान झांकलं आहे. पदरापूर्वीहि तुझं स्त्रीत्व झांकलं आहे-त्या हिरव्या गहिऱ्या चोळीनें.पण तरीहि तुझ्या स्त्रीत्वाचा संकोच संपलानाहीं—म्हणून तो संपवला आहे या पदराच्या अवगुंठनानें. आणि या अवगुंठनानें झांकले आहेत तुझे भरलेले बाहु... तुझी रुंद पाठ...झांकली आहे पण लपवलेली नाहीं. तुझ्या या पदरानें— नाहीं या साऱ्याच शुभ्र वस्त्रानें तुझ्या सौष्ठवाचं सारं सौंदर्य झांकलं आहे पण लपवलेलं नाहीं. या शुभ्र तलम वस्त्रानें आठवणीनें तुझ्या सौष्ठवाचं प्रत्येक सौंदर्य सुचवलं आहे... सुचवलं आहे आणि तेंहि मर्यादेनं. लज्जा... संकोच. मर्यादा... तुझ्या सौंदर्याचे हे रंग या शुभ्र आवरणाआडून किती किती पण खुलताहेत. शुभ्र वस्त्राचा हा पदर डाव्या खांद्यावरून तुझी रुंद पाठ झांकत, उजव्या खांद्यानें खालीं उतरण्यापूर्वीं, मानेवरून त्याच्याशीं अवखळपणा करणाऱ्या आंबाडयाला, चंद्रकोरीच्या चुणीची मुग्ध सोबत देऊन नंतरच खालीं उतरला आहे. काळ्याशार महिरपींतून केसांच्या आरक्त कर्णांची पाकळी खुलते आहे. आणि त्या पाकळीवरची तुझी मोत्यांची कर्णफुलं शुभ्र हास्य सांडताहेत. तूं सारीच कशी हंसरी हंसरी आहेस... तीं कर्णफुलं हंसताहेत... तुझे ते डोळेहि पापण्याआडून स्मित करताहेत... किंचित् विलग झालेल्या अधर पाकळ्यांतून हास्याची प्रभा सांडते आहे...पण भ्रम पडतो आहे... ती प्रभा तुझ्या मधुर स्मिताचीच आहे... कां ते तुझ्या दंतकणांचें तेज आहे ? आणि केसांच्या काळ्या कडांनीं कोरलेल्या तुझ्या कपोल प्रांतीं, क्षितिजावर बुडणारा नारायण तर अवतरलेला नाहीं ? नाहीं. नारायण क्षितिजावरच बुडतो आहे... आपली गुलाबी प्रभा आकाशांत उधळतो आहे... संध्येचं सार विलोभनीय सौंदर्य तुझ्या सौंदर्याची केवळ पार्श्वभूमि होऊन राहिलं आहे.

आणि मी—?

मी केव्हांच संपलो आहे. उरली आहे केवळ समोरच्या या अपूर्व सौंदर्याच्या साक्षात्काराची अनुभुति !

★★★











# नवरा माझा मुठींत

—आनंद साधले

**महाभारत जुनं झालं नाहीं, महाभारतांतलं 'सत्य' जुनं झालं नाहीं, 'तत्त्व' जुनं झालं नाहीं. कारण माणसाच्या मनांतल्या 'सनातना'चा साक्षात्कार तिथें दिसतो —**

**—अशाच एका सत्याचा हा मनोज्ञ साक्षात्कार!**



**सत्यभामेनें** एकदां द्रौपदीला विचारलें, "द्रौपदी, तुझे पांचही नवरे सारखे तुझ्या मुखाकडे पहात असतात. सर्वस्वीं तुला वश असतात. त्याचें इंगित काय गडे? कांहीं व्रत, औषध, मंत्रतंत्र, जादूटोणा असेल तर मला सांग ना. म्हणजे हा सतराजणींचे उंबरे फिरणारा श्रीकृष्ण मी त्यानें वश करून घेईन."

त्यावर द्रौपदी हंसून म्हणाली, "कुलटा स्त्रीला विचारावा तसला हा प्रश्न तूं मला विचारीत आहेस. खुळे, नवरा कां मंत्रतंत्रांनीं वश होतो? उलट बायको आपणांवर मंत्र घालीत आहे असा पुसटही संशय आला, तर साप शिरलेलें घर सोडावें तसें नवरा तें घर सोडण्याचीच शक्यता आहे. बायको असल्या फंदांत पडली तर नवरा संकटांत मात्र सांपडतो. नवऱ्याचे शत्रू त्या बायकोच्या हातून जडीबुडी म्हणून नवऱ्यास विष पाजूं शकतात. रोग जडवूं शकतात, नपूंसक करवूं शकतात.

"मी बाई असला मंत्र तंत्र कांहींही करीत नाहीं. मी माझा मीपणा आणि स्वतंत्र व्यक्तित्व विसरून माझ्या पतींच्या मुखाकडे पाहते. प्रणय जीवन जगतांना सुद्धां मी माझ्या मनावर तावा ठेवून केवळ पतीची सेवा करण्याचें साधन, त्यांना सुख देण्याचें साधन म्हणूनच त्याच्याकडे पाहते. मी कधींही असभ्य शब्द बोलत नाहीं. असभ्यपणानें उभी रहात नाहीं. उठवेळपणानें चहूंकडे पहात नाहीं. पतीच्या यत्किंचित संकेता-वरून त्याचें मन ओळखते आणि तशी वागते. पतीची कोणतीही सेवा करतांना मला कधींही कमीपणा वाटत नाहीं. पतीहून सुंदर, वैभवसंपन्न पुरुष जरी मला दिसला तरी मी त्याचा विचारही करीत नाहीं. पतीचें भोजन नीट पुरें झाल्याशिवाय मी कधीं जेवत नाहीं. त्यांना मनसोक्त स्नान घातल्याशिवाय मी नहात नाहीं. त्यांना गाढ झोंप लागेपर्यंत मी झोंपत नाहीं.

"पती बाहेरून आले कीं मी झटकन उठून सुहास्य वदनानें त्यांचें कुशल विचारते. अगत्यानें त्यांचे पाय धुवून त्यांचें स्वागत करते. माझ्या मंदिरांतील सर्व पात्रें कटाक्षानें स्वच्छ केलेलीं असतात. मी स्वादिष्ट स्वयंपाक करून वेळेवर त्यांना जेवण मिळण्याकडे लक्ष देते. घराचा कोनाकोपरा नेहमीं पवित्र ठेवते. पतीना प्रिय असणाऱ्या गोष्टींचा छुपा संग्रह मी नेहमीं हाताशीं ठेवते. कुणाबद्दलही तिरस्कार व्यक्त होईल असें मी कधींही बोलत नाहीं. आळस आणि दुष्ट स्त्रियांची मैत्री टाळून मी नेहमीं पतींना अनुकूल रहाते. पती विनोद करीत नसतील तेव्हां मी फिदी फिदी हंसत नाहीं. मी दाराच्या उंबरठ्यावर जाऊन उभी रहात नाहीं. बागेंत वेळीं अवेळीं एकटी फिरत नाहीं.

"मी नीच पुरुषांशी चकाट्या पिटीत नाहीं. कधीं असंतुष्ट रहात नाहीं. दुसऱ्यांच्या चर्चेमध्यें भाग घेत नाहीं. दुसऱ्यास राग येण्यास अवसर देत नाहीं. मी सदा सत्य बोलते. नवऱ्यांना सोडून मी कुठेंहि एकटी जात नाहीं आणि रहात नाहीं. नवरे जवळ नसतील तेव्हां मी फुलांचा शृंगार करीत नाहीं, अंगरागाचे टेंव करीत नाही. मी व्रतस्थ रहाते. पतींना जें खायला प्यायला आवडत नाहीं त्याचा मी त्याग करिते. पती जवळ असतांना मी उचित वस्त्र भूषणांचा सुंदर शृंगार करते.








पतींचे प्रिय आणि पतींचें हित यांचे ठायीं मी सदाची रत असते. अभ्याग-तांच्या आदरसत्कार आदि गृहिणीचीं कर्तव्यें मी नीट सांभाळते.

“माझे पती सज्जन, मृदुल स्वभावी आणि प्रेममय आहेत. तरीही एकाद्या संतप्त सापाला भिवून असावें तशी मी त्यांना भिवून वागते. पतींच्या आश्रयानें स्त्रियांना सुख मिळतें. पती ही त्यांची देवता आणि गती आहे अशी माझी धारणा आहे. पतींना नावडणारा दागिना सुद्धां मी वापरीत नाहीं. सासू आदि पतींना प्रिय असणाऱ्यांची मी कधींही निंदा करीत नाहीं. सासूच्या जेवणाखाण्याकडे मी स्वत: लक्ष देते. कपडे लत्ते वगैरे कोणतीही गोष्ट सासूबाईपेक्षां जास्त डामडौलाची माझ्या-साठीं वापरत नाहीं. मी सकाळीं सर्वांत प्रथम उठून गुरूंच्या सेवेस तत्पर रहाते. त्यामुळें माझे पती माझ्यावर प्रसन्न आहेत.

“सखे, माझ्या पतींकडे हजारोंचा प्रपंच चालतो. त्या सर्वांवर माझी सूक्ष्म नजर असते. इथें हजारों दास दासी आहेत. त्या प्रत्येकाचें नांव, रूप, संवयी, ठावठिकाणा याची मला खडानूखडा माहिती आहे. कुणी काय काम केलें आणि कुणी काय काम केलें नाहीं याचें मला बरोबर ज्ञान असते. आमचे लक्षावधी घोडे आणि हत्ती यांची बरोबर गणना आणि त्यांच्या बरोबर गरजा हें सारें मी सांभाळते. प्रतिहारीपासून दरवानापर्यंतच्या हजारों नोकरांची देखरेख मी सांभाळते. कुणाच्याही कामांतील एवढासाही उणेपणा माझ्या नजरेंतून सुटूं शकत नाहीं. पांडवांचा आय व्यय आणि वचत मी जाणते आणि साऱ्याचा हिशोब मीच ठेवते. तिजोरींतील कोट्यवधि रत्नें आणि गोशाळेंतील लाखों गाई यांतील प्रत्येकाचें मूल्य, इतिहास, आणि स्थान यांची मला बरोबर माहिती आहे. या प्रचंड जबाबदारीचा भार माझ्या शिरावर घेऊन मी माझ्या पतींना पराक्रम करण्यास मोकळे सोडले आहे. मी स्वत:च्या सुखांत रंगून एक क्षणही या भाराला दूर करीत नाहीं. मी समर्थपणें हा भार सांभाळीन असा माझ्या पतींना भरंवसा आहे. वरुणाच्या खजिन्या-प्रमाणें अथांग आणि अगम्य अशा माझ्या पतींच्या खजिन्यांत काय आहे हें एकटी मीच जाणते. रात्र असो वा दिवस माझ्या पतींचा हा सारा भार मीच वहाते.

“गडे सुखाच्या मागें लागून सुख मिळत नाहीं. दु:खें आणि जबाब-दाऱ्या यांच्या मार्गानेंच सुखाच्या मंदिराकडे जातां येतें. पती एखाद्या दासीला कांहीं काम सांगत असले तरी मी उठून ते स्वत: करते. मनाच्या गाभ्यापासून मी पतींच्या सेवेस तत्पर रहाते आणि माझे गुणज्ञ पती तें जाणतात. पतींच्याकडून क्षुल्लकही गोष्ट मला कळली तरी ती मी कुणाशींही बोलत नाहीं. कारण त्याच्याकडून जर ती पुन्हां माझ्या पतींच्या कानांवर गेली तरी मी पतींच्या मनांतून उतरेन. पतींचे जे प्रिय मित्र आहेत त्यांना मी तऱ्हतऱ्हानीं खाणें पिणें देऊन आनंदी ठेवते. पतींना अप्रिय असणाऱ्यांशीं काडीचाही संबंध ठेवत नाहीं. माझ्या सावत्र मुलांना सुद्धां जवळ घेऊन मी कधींही एकांतांत बसत नाहीं. कारण ते आतां मोठे झालेले आहेत.

“सखे, तुला वाटेल हीं बंधनें आहेत; मी स्वतंत्र नाहीं; पण तसें नाहीं. या बंधनांतूनच मला उत्तम भाग्य लाभलें आहे. उत्तम संतान, तरत-हेचे भोग, शय्या, आसन, सुंदर वस्त्र, माला, सुगंध याची मला प्राप्ती झाली आहे. सत्यभामे, मी सुखी आहे; यशस्विनी आहे; मी राणी आहे; स्वतंत्र आहे; त्रिभुवनाची सम्राज्ञी आहे.

“माझे पति माझे दास आहेत; मला वश आहेत; माझ्या मुठींत आहेत. माझ्या यत्किंचित् इच्छेनुसार माझे समर्थपती त्रिभुवन उलटें पालटें करतील.”

●●●

[अडीच हजार वर्षांपूर्वी लिहिलेल्या महाभारतांतील हा एक प्रसंग. या प्रसंगी द्रौपदी जें म्हणते त्यापेक्षां फारसें वेगळें असें आजची स्त्री म्हणूं शकेल असें वाटत नाहीं.]

(महाभारत वन पर्व, अध्याय २३३–२३४)

---

## लांडगा आला रे आला...

लग्न होऊन मला आतां
तीन वर्षें झालीं आहेत
आमच्याकडे संशयानें
लोक पाहूं लागले आहेत..

“जळजळ” “मळमळ” “कसेसें” चा
आमच्या घरीं पत्ताच नाहीं
‘तशी’ कांहीं नवी हालचाल
अजून आमच्या घरीं नाहीं...

उठाठेव करणाऱ्यांना
एवढा विषय पुरतो आहे
मी धीर धरला तरी
‘हीं’चा धीर सुटतो आहे...

घरच्या प्रत्येक पत्रामध्यें
एक तरी प्रश्न असतोच
सुनबाईच्या प्रकृतीची
जो तो विचारपूस करतो..

‘आलबेल’ ‘छान आहे’
नेहमी उत्तर लिहितो आहे
प्रत्येक पत्र वांचत असता
‘ही’चा चेहरा पडतो आहे...

कॅलेंडरचा प्रत्येक महिना
नवी आशा दाखवत येतो
ऐन वेळीं दगा देऊन
प्रत्येक महिना निघून जातो...

कधी कधी ‘ही’च्या मनांत
नवीन आशा फुलूं लागते
आणि ‘ही’च्या चेहऱ्यावरून
मला त्याची बातमी लागते...

मग आमच्या घरांत एक
नवे स्वप्न रंगूं लागते
पण साकार होण्यापूर्वीच
आमचे स्वप्न वाहून जाते...

“लांडगा आला रे आला”ची
अधून मधून हूल उठते
मला जरी खात्री नसते
तरी ‘ही’ला भूल पडते...

शेवटी लांडगा येतच नाही
गोड - भीति खोटी ठरते.
इसापाची - गोष्ट मात्र
अर्ध्यावरच येऊन तटते...

गोष्ट पुरी होण्यासाठीं
सारे आतुर झाले आहेत
लांडगोबाची वाट सारे
आतुरतेनें पहात आहेत...

लग्न होऊन तीन वर्षें
आतां होऊन गेलीं आहेत.
आमच्याकडे संशयानें
लोक पाहूं लागले आहेत.



—मधुसूदन गोखले



अनुक्रमणिका

*'थँक्स' म्हणत तो गेला खरा—पण डॉक्टरांना मात्र त्या गूढ नव्या 'व्हायरस'ची आठवण झाली. लाटेप्रमाणें रिकाम्या अवकाशांत फेसाळून फुटणारी, रहस्यमय, दुर्बोध सांथ..........*




—दिलीप पु. चित्रे



**डॉक्टरांनीं** डेटॉलच्या पाण्यानें हात धुतले आणि टॉवेलला हात पुसून ते परत खुर्चीवर जाऊन बसले. त्यांचा अगोदरचा पेशंट – एक अस्थमॅटिक म्हातारा – एफिड्रिनचं इंजेक्शन् घेतलेला दंड ताठ धरून तसाच बाहेर पडला, आणि पुढला पेशंट आंत आला.

"हं, काय झालंय् ?" डॉक्टरांनीं समोरच्या किडकिडीत, उंच, नर्व्हस् तरुणाला विचारलं. त्याच्या गालाची साल पातळ होती, त्याच्या चेहऱ्यावर दोन दीनवाण्या सुरकुत्या होत्या. साधारणपणें एम्. ए. झालेले, लग्नाचं वय उलटून गेलेले, मन दडपणारे, आत्मविश्वासाचा अभाव असलेले, चिरके आणि कणसुरे लोक जसे दिसतात तसा तो दिसत होता. ह्याला इतर कांहींहि झालं असलं तर टेस्टेस्टेरॉनचीं इंजेक्शनं घ्यायलाच लागणार असं डॉक्टरांचं मत झालं.

"भूकच लागत नाहीं डॉक्टर" – anorexia, डॉक्टरांनीं टिपलं – "थकल्या सारखं वाटतं, काम करायला उत्साहच वाटत नाहीं" – nervous exhaustion डॉक्टरांनीं दुसरी नोंद केली – "पाठींत दुखतं आणि झोंप नीट लागत नाहीं."

"असं कधींपासून व्हायला लागलं ?"

"तीन चार महिने झाले."

"त्यापूर्वीं ठीक होतं ?"

"हो."

"वजन काय होतं तेव्हां ?"

"एकशें सत्तावीस."

"आवां करून बघा जरा –"

घाबरत घाबरत तो वजनाच्या कांट्यावर उभा राहिला.

"ताठ उभे रहा. दोन्हीं पाय जवळ घ्या. हं असे. एकशे बारा. म्हणजे सुमारें पंधरा पौंड घटलंय् तीनचार महिन्यांत. पण एकशेंसत्तावीस नक्की होतं का ? कीं जरा जास्तच सांगितलंत ?"

त्याचा चेहरा शरमेनें लाल झाला, "खरंच कमी झालं असेल एवढं. मला जाणवतंय्."

"तुम्ही काम कोणत्या प्रकारचं करता ?"

"मी एका कॉलेजांत डेमॉन्स्ट्रेटर आहे."

"कसले ?"

"फिझिक्स्चा."

"काम बरंच् असेल ?"

"हो. जवळजवळ सहा तास. शिवाय करेक्शन्स् वगैरे."

"तुमचं नेहमीचं डाएट काय ?"

"व्हेजिटेरियन."

"तसं नाहीं. काय काय खातां – किती खातां ?"

"हल्लीं वेळेला दोन पोळ्या, भाजी, आमटी, भात आणि दही खातो.

"म्हणजे सरासरी माणसाच्या आहाराहून जास्तच आहार झाला. भूक लागत नाहीं ?"

"पूर्वी जास्त लागत होती."

"लग्न झालंय् कीं, बॅचलर आहांत ?"

"तेंच" तो घुटमळत म्हणाला, "डिसेंबरांत व्हायचंय्. आणि एवढ्यांत माझी प्रकृति बिघडली म्हणून दाखवायला आलों. म्हटलं एकदां चेकप् करून घ्यावा."

"बघूं जरा. तिथे टेबलावर पडा."

तो पुन्हां नर्व्हसपणें उठला आणि टेबलावर जाऊन पडला.

"कधीं चक्कर वगैरे आल्यासारखं होतं ?"

"हो, अलिकडे बरेचदां गरगरल्यासारखं वाटतं."

डॉक्टरांनीं प्रथम छाती, पोट वगैरे तपासून त्याला प्रश्न विचारले, मग त्याचं ब्लड्प्रेशर पाहिलं, तें जरा कमीच होतं.

"असं करा. मी तुम्हांला बी – कॉम्प्लेक्स् आणि आणखी एक टॉनिक देतो. ते सांगितल्याप्रमाणें पंधरा दिवस घ्या. पंधरा दिवस रजा घ्या. नियमित जेवत जा. सकाळीं ग्लासभर दूध घेत जा. जेवल्यानंतर एखादं केळं घ्या. वरणभाताबरोबर लिंबू खाता काय ? खात जा. डाळी जास्त घेत जा. मुगाची डाळ बरी पडेल. पंधरा दिवसांनीं मला भेटा."

डॉक्टरांनीं त्याला प्रिस्क्रिप्शन् देण्यापूर्वी नांव विचारलं,

"रविंद्र नाशिककर" तो म्हणाला.

"बरं, मिस्टर नाशिककर. पंधरा दिवसांनीं या."

"डॉक्टर" तो चांचरत म्हणाला, "फी ?"

"मागाहून."

"थँक्स्."

सैल टांगा टाकत तो बाहेर गेला. त्याचे गुडघे अशक्त असावेत. हा सुधारतांना दिसला नाहीं तर कदाचित् ह्याला एक्स्रे घ्यायला लागेल छातीचा. पण बहुतेक हे लग्नापूर्वीचं नर्व्हसपणाचं चिन्ह् दिसतंय्. काळजी, कमजोरी, मानसिक अशक्तता. अलिकडे असले पेशंट वाढलेत.

डॉक्टरांनीं डिस्पेन्सरी बंद केली आणि ते घरीं गेले.

☆ ☆ ☆

पुढल्या पंधरा दिवसांत त्यांना नाशिककरची आठवण झाली नाहीं. तीन पेशंट सीरियस् होते. चवदा वर्षांच्या एका मुलीला एन्कॅफलायटिस् झाला, तिला हॉस्पिटलांत पाठवावी लागली. दहा दिवस एका कॉरोनरी पेशंटवर सक्त नजर ठेवावी लागली. एक म्हातारा सेरेब्रल हेमोरेज होऊन दगावला. आणि दहा दिवस डॉक्टरांना बायकोमुलांची तोंडं बघायलाहि फुरसत झाली नाहीं.

जेव्हां एका मित्राचंच कॉरोनरी फेल्युअर होऊन मरण आलं त्याला, तेव्हां डॉक्टरांना एकाएकीं आपलं अयुष्य अर्थशून्य असल्याची शंका आली—

"We know better than the average human being how death makes its approach: abruptly or gradually, arrogantly or politely: we know hundreds of causes of death: yes, we know a lot about death. We spend our lives postponing other people's deaths and we postpone our own lives to save other people's". त्यांचा तो डॉक्टर मित्रच त्यांना एकदां म्हणाला होता, "आपण इतर कांहीं करत असतो तर बरं झालं असतं. ही झोपेंत चालणाऱ्या माणसांची कार्यक्षमता—मला हिचा अगदीं वीट आलाय्. हें धन्वंतरीचं अघांतरीचं आयुष्य – सतत फक्त रोग आणि रोगी, मरण, दुखणीं, शरीरं, — मला तर आतां शरीरांबद्दल कांहींहि वाटेनासं झालंय्. मी जेव्हां बायकोबरोबर——"

"This is schizophrenic thinking, डॉक्टर त्याला सांगणार होते, you've got to believe in what you are doing — belief gives you a superb concentration — and concentration gives you fulfilment. पण मग त्यांना त्यांच्या एका सर्जरीच्या प्रोफेसरचं वाक्य आठवलं, "Twenty years I've been operating kidneys — and now I believe less in them than I used to when I started as assistant surgeon." हें विनोदानें म्हटलेलं असेल, पण त्यांत एक चमत्कारिक सत्य संदिग्धपणें सांगितलेलं आहे – कोणीहि त्याचा कसाहि अर्थ लावावा—त्या अर्थात त्याला स्वतःचा आयुष्याविषयींचा दृष्टिकोन सांपडेल.

डॉक्टर वेळ मिळेल तेव्हां एकाच गोष्टीचा विचार करत : निर्मिति. बरं करणं, कापून टाकणं, जगवणं ह्यांच्या अगोदर जें असतं तें. चित्रकार चित्रं कां काढतात ? कविता लिहायला कवी कसे धजतात ? धर्मश्रद्धा कोठून उत्पन्न होते ? सामाजिक कार्यकर्त्यांना असा माणुसकीचा काय साक्षात्कार झालेला असतो ? मुलांचा जन्म झाल्यावर आईवडिलांना कोणती अमोघ भावना चाटून जाते ? लढाया कशासाठीं होतात ? क्रांति कां होते? खून कां होतात ? आत्महत्या कां केल्या जातात? समाधि कां घेतली जाते ? कांहीं लोक उगाचच कां खचून जातात आणि कांहीं उद्दाम आवेशांत कशासाठीं मरून जातात ? निर्मिति आणि संहार. हा वास्तवाचा अनाकलनीय कॉन्स्टन्ट : प्रत्येकाच्या पोटचा गोळा – भीतीचा बोळा – बोवडीचा, डोळा – दर्शनार. अशा वेळीं आपण आपल्या मुलांना कशासाठीं काय शिक्षण देतोय् हेंहि त्यांना कळेनासं होई. आपली बायको आपली रोज

### सवाल

तुझे लचकत चालणें
तुझे रंगीत ओठ
तुझा ढळता पदर
आणि उघडे पोट
तुझा 'मारू' नखरा
तुझी पतली कम्बर....!
गडे सांगशील का पण
तेवढा चश्म्याचा नंबर?


—सदाशिव करंदीकर

कशासाठीं वाट पाहते हें त्यांना समजेनासं होई. आपण आपल्याच आयुष्याचा डिफरेन्शियल डायाग्नॉसिस करायला हवा – पण – "प्रोग्नॉसिस निल्" हा शेरा त्यांना आठवायचा आणि आपल्या तल्लख हातांचा आणि कार्यक्षम मेंदूचा हेतूच अंधुक झाल्यासारखा वाटायचा. मित्र वारल्यावर पंधरा तास त्यांना झोंप नीट लागली नाहीं. कारण स्मशानांतून परतल्यावर गरम पाण्यानें आंघोळ करून ते झोंपले तेव्हां त्यांना एक चमत्कारिक स्वप्न पडलं — त्यांनीं एका प्रचंड नादशून्य आणि लखलखीत निरामय प्रयोगशाळेंत प्रवेश केला. तोंडावर सफेत मास्कस् लावलेले अनेक असिस्टंटस् तेथे तरल पावलांनी तरंगत चालते होते. समोरच्या टेवलावर एक मायक्रॉस्कोप होता आणि त्यांचा मित्र त्यांना तिकडे खुणेनें बोलावत होता. डॉक्टरांनीं मायक्रॉस्कोपला डोळा लावला. त्यांना त्यांत जांभळा अवकाश नुसता दिसला ( You fool, this is a telescope — the disc is empty sky!!— ते म्हणणार होते) इतक्यांत त्या अवकाशाला एक सुरकुती पडली आणि तिचीच एक लाट झाली, खवळली, आणि फुटली. त्यांतून कांहीं विचित्र सूक्ष्म जीवाणु फवाऱ्यासारखे पसरले. Look, look, that's the mysterious virus (It can't be seen in empty space, my dear fellow, where's its medium).
आणि एकदम वज्रनिक्षेप झाला. डॉक्टर जागे झाले. आपला मित्र चारच तासांपूर्वी वारला ह्याचीहि त्यांना आठवण झालीं नाहीं, ते ग्लासभर पाणी प्यायले आणि त्यांनी कूस पालटली.

☆ ☆ ☆

पंधरा दिवसांनी नाशिककर येऊन हजर झाला. त्याचं वजन किंचित् वाढलेलं दिसलं, तें गेल्या वेळेपेक्षां दोन पौंड जास्त भरलं.

"कसं वाटतंय् नाशिककर ?" डॉक्टरांनीं विचारलं.

"थोडंसं बरं वाटतंय् डॉक्टर पण –" तो चांचरला.

"पण काय ?"

"झोंप अजून नीट लागत नाहीं." चुळवुळत नाशिककर म्हणाला. त्याच्या दोन्हीं डोळ्यांभोंवतीं काळी वर्तुळं होती.

"असं कां व्हावं ?"

"कोणास ठाऊक."

"तुम्ही कसली काळजी करतांय् ?"

"छे: काळजी कसली डॉक्टर ?" अपराधी आवाजांत नाशिककर म्हणाला.

"तुमचं लग्न कधीं ठरलं हो ?"

"तीन चार महिन्यांपूर्वीं —"
आणि मग झोंप कमी झाली, भूक मंदावली, पाठींत दुखायला लागलं...हं.

"आणि कधीं करतांय् ?"

"डिसेंबरमध्यें." नाशिककर हात हलवत म्हणाला. खुर्चीच्या हातावर त्याचा हात लाकडी हातासारखा यांत्रिकपणें हलत होता, "पण डॉक्टर, जरूर पडली तर तारीख पुढें ढकलतां येईल. मला पूर्ण बरं वाटलं कीं –"

"तुम्हीं अगदीं नॉर्मल आहांत नाशिककर. तुम्हांला ह्याचीच काळजी वाटतेय् कां ?" नाशिककर बसल्या जागीं थरथरला. त्याचं गळ्याचं हाड थरथरलं.

डॉक्टर संथ, आत्मविश्वासपूर्ण आवाजांत म्हणाले, "मी तुम्हांला एक इंजेक्शनचा कोर्स देतोय्. आत्तांच सुरूं करूं. हें समोरच्या केमिस्टकडून घेऊन या."

— टेस्टेस्टेरोन.

नाशिककर परत आला तेव्हां डॉक्टरांनीं त्याच्या दंडांत सुई खुपसत विचारलं "तुम्हांला लग्न करायची भीति वाटतेय् कां नाशिककर?" त्याचं ब्लड् व्हेसेल रप्चर झाल्यामुळें डॉक्टरांना सुई काढून घ्यावी लागली, "हात सैल सोडा. पूर्णपणें सैल. रिलॅक्स्. हं. झालं."

स्पिरीटचा बोळा डॉक्टर त्याच्या दंडावर दावत असतांना नाशिककर दबल्या, भ्याल्या स्वरांत म्हणाला, "हो — म्हणजे मला जरा नर्व्हस वाटतंय्. मला कांहीं रोगबीग असला तर —"

"मला तसं कांहीं वाटत नाहीं." डॉक्टर म्हणाले, "पण मी तुम्हाला संपूर्ण चेक् करीनच"

नाशिककर पुटपुटला, "बरं."

"मंगळवारीं परत या. –" डॉक्टर म्हणाले.

☆ ☆ ☆

नंतरच्या रविवारीं डॉक्टर अनेक दिवसांनीं बायको-मुलांसह जुहूला गेले. अचानक आपण स्वच्छ,कोवळे आणि मोकळे झालोंत असं त्यांना वाटलं.

सैल शर्ट घालून ते वाळूंत पडले होते आणि बायकोशीं काय बोलावं हें त्यांना कळत नव्हतं एवढं एकच त्यांना खुपत आणि सुखावत होतं.

समुद्राच्या लाटा फेंसाळत, फुटत होत्या. आकाशाचा रंग अमोघ निळा होता आणि वाळू कांचेसारखी शुभ्र चकाकत होती, आणि मुलांनी शिंपल्या जमवल्या होत्या.

जग अफाट आणि वैभवशाली होतं. डॉक्टर थेराप्युटिक इंडेक्स् आणि हातच्या केसेस् विसरून नुसतेच आश्चर्यानें त्या विलक्षण, शांत, अफाट, उधळ्या दृश्याकडे बघत राहिले.

त्या रात्रीं त्यांना गाढ झोंप लागली. पण दुसऱ्या दिवशीं सकाळींच नकळत त्यांना नाशिककरची आठवण झाली. मी त्याच्या केसमध्यें गुंतत चाललोंय्.

— मी सगळ्यांच्याच शरीरांत, मनांत, आत्म्यांत आतां गुंतत चाललोय्.

— डॉक्टर पुन्हां स्वत:विषयीं विचार करूं लागले.

☆ ☆ ☆

"आणि बघा नाशिककर, सगळं तुमच्या कॉन्फिडन्स्वर अवलंबून राहील. ड्यूटी म्हणून कांहींहि करत राहिलं तर त्याचा जीवघेणा ताण पडतो. लोकांना अल्सर्स होतात, इंपटन्स – कॉम्प्लेक्स् उत्पन्न होतो, स्वत:चंच काम खायला येतं." डॉक्टर स्टेथॉस्कोपकडे बघत म्हणाले — Systoles, diastoles

"थँक्यू, डॉक्टर, थँक्यू व्हेरि मच्" नाशिककर विरळ आवाजांत म्हणाला.

डॉक्टरांना ते शब्द अगदीं लांबून घंटानाद ऐकूं यावा तसे ऐकूं आले. हवाभर पसरत जाणारं पितळ.

आणि अचानक त्यांना त्या गूढ नव्य व्हायरसची आठवण झाली – लाटेप्रमाणें – रिकाम्या अवकाशांत फेसाळून फुटणारी रहस्यमय, दुर्बोध सांथ....

●●●



**तो** असाच अधून मधून तिला भेटायला येतो. अगदीं अचानक. त्याच्या येण्यानें ती खूपच आनंदून जाते. तिच्या आनंदाला पारावार उरत नाहीं. तिला आनंदांत बघून तो सुखावून जातो. त्याला वारंवार हंसायला येते. त्याच्या वारंवार हंसण्यानें तिला अगदीं नकोसं होतं. कधीं ती चिडते रागानें तर कधीं अनुरागानें. किती तरी वेळांपासून तीं दोघे मन मानेल तिकडे भटकत असतात. सायंकाळच्या सुमाराला बर्डीवर यतात. बर्डीचा व्हेरायटी चौक माणसांनीं गजबजलेला असतो. अनेक विवाहित तरुण-तरुणी शॉपिंगला आलेली असतात, रस्त्याच्या कडेला आपापल्या गाड्या पार्क करून. त्या दोघांनाहि ती गर्दी हवीहवीशी वाटूं लागते. एकमेकांना खेटून जाणें भाग पडावें इतकी गर्दी रंगीबेरंगी पोशाखांतली जोडपीं. तीं जोडपीं बघून तिचं मन मोहरून. निघतं. ती त्याला अधिकच खेटून चालूं लागते. त्याच्या शरीरभर एक कंप थरारून जातो. चालतां चालतां ती थबकते. चमेलीचे गजरे विकणाऱ्या माणसाला विचारते–

"केवढ्याचा रे ?"

"चार आणे बाईसाहेब. ताज्या चमेलीचा आहे. रात्रभर वास जाणार नाहीं नाकांतून !"

त्याच्या बोलण्यावर तो बेहद्द खूष होतो. तिच्याकडे मिस्किलपणें बघतो. आणि चटकन् पाकीट काढून फुलांची वेणी विकणाऱ्या माणसाच्या हातावर पैसे टाकतो.

"पैसे मी देतो !"

"असूं दे ! please !"

ती गजरा घेते.

"आपण असं करूं या—"

"कसं ?" ती गजऱ्याचा वास घेत विचारते.

"खूप दमलोंय् आपण. 'कोहिनूर' मध्यें एखादें पेय घेऊं या !"

"खरेंच. पायीं भटकून मी खूपच दमलो !"

ती दोघेहि 'कोहिनूर'चा जिना चढूं लागतात. ती पुढें असते. तिच्या हालचालींतून उत्साह ओसंडूं लागतो. एखाद्या आठ दहा वर्षाच्या मुलीसारखी ती जिना चढूं लागते. कांहीं पायऱ्या चढून गेल्यावर त्याच्याकडे बघते. हंसते.

"ये ना लौकर ! इतक्यांत दमलास कां ?"

"दमलो ?" तो हंसतो. दोन दोन पायऱ्यांची एकेक करून तिच्याजवळ येतो. हलकेंच तिच्या कानाशीं तोंड नेऊन म्हणतो–

"म्हटलं मी तरुण आहे !"

**स्त्रिया रागावल्यां म्हणजे फार सुंदर दिसतात नाहीं ? नका सांगूं तुमचा अनुभव आणि तुमचें मत ! फक्त न लाजतां ही लज्जतदार मीति कथा वाचा —**

**— ठरीव ठशांत न बसणारी !!**



**—मनोहर तल्हार**

ती त्यावर फिस्कन् हंसते. तोंडावर तळहात दाबून. जिन्यांतल्या भल्यामोठ्या आरशाजवळ थांबून ती स्वतःचं प्रतिबिंब न्याहाळते — नवख्या नजरेनं. हिरवीगार साडी आणि हिरवा पोलका आपल्या गोऱ्या शरीराला खूपच खुलून दिसूं लागलेला बघून ती स्वतःवरच लट्टू होते.

तिच्या हालचाली तो बारकाईनें न्याहाळतो. म्हणतो—

"नवरी शोभतेस !"

ती रुष्टपणें त्याच्याकडे बघते. मग हांतातली वेणी त्याच्यापुढें धरून म्हणते —

"माझ्या केसांत माळ बरं ही !"

"इथें ? या जिन्यांत ?"

"काय हरकत आहे ?"

"'कंपार्टमेंट'मध्यें तिथें कुणी नसतं."

"अस्सं—" ती हट्टी आवाजांत म्हणते. तो तिचा हात धरून तिला ओढल्यासारखा करतो. ती झेपावल्यागत सरकते. ती दोघेंहि एका 'कंपार्टमेंट'मध्यें शिरतात. ती निळसर पडदा सरकावून व्यवस्थित करते. म्हणते—

"हं, एवढं काम आटप लवकर !"

"कुठलं ?"

"वेणी !" ती गजरा त्याच्या नाकासमोर धरते. चमेलीच्या सुगंधानें तो मस्त होतो. मन कणकणांतून मोहरून येतें. पुन्हा एकदां एक अनामिक कंप त्याच्या शरीरभर थरथरून जातो.

"सुगंध चांगला आहे ना ?"

"वंडर फुल !"

"छे. चमेलीचा फूल !"

तिच्या बोलण्यानें तो खदखदून हंसतो. तीहि हंसते.

"हे देखील वंडरफुल !" तो तिच्या हातांतला गजरा घेतो. तो माळण्यापूर्वी तिची वेणी किंचित् ओढतो. ती स्सकन् करते.

"ओढूं नको फुलवेणी, नको रे कृष्णा—ओढूं नको फुलवेणी" तो हलकेंच तिच्या कानांत ती ओळ गुणगुणून विचारतो—

"ओढूं कां ?"

"हें रे काय ?"

"राहूं दे !" तो तिच्या वेणींत गजरा माळतो. माळलेल्या गजऱ्याचा, नाक टेकवून दीर्घ श्वास घेतो. म्हणतो—

"आतां रात्रभर हा वास नाकांतून जाणार नाहीं !"

"जागरण करणार आहेस कां वासासाठीं !"

"तुझ्या सहवासासाठीं !"

ती त्याच्या तोंडावरून हात ओवाळते. म्हणते —

"लग्नापूर्वी असं मनांत आणणं पाप आहे !"

"खरं म्हणजे लग्नापूर्वी प्रेम करणं हेंहि पाप आहे !"

"आपण पापी आहोंत !" ती मोठ्या गंमतीच्या सुरांत म्हणते. तो बसतो. ती उभीच असते.

"बसायचं नाहीं कां ?"

"कुठें बसूं ?"

"इथें !"

"नको. ती तुझ्या मिसेस्‌ची राखीव जागा आहे."

"तूं 'डिपॉझिट' भरून टाक !"

"तूं तें जप्त करशील !"

दोघेंहि हंसतात. ती समोरच्या खुर्चीत बसते.

"बोलाव् काय बोलावतो ते चटकन् !"

"घाई झाली आहे कां ?"

"तसं नाहीं. आतां खरं म्हणजे कांहीं तरी प्यायलाच हवं आहे !"

"काय घेणार ?"

"काय देणार आहेस ?" ती त्याच्याकडे इसऱ्या नजरेनं रोखून विचारते.

"तूं मागशील ते ! जें मागाल तें मिळेल ! तुमची प्रिय व्यक्ति सात समुद्र पार करून तुमच्या पायाशीं लोळण घेईल. अंगठीची किंमत फक्त दहा रुपये."

"फक्त चहा हवाय्" ती 'चहा' वर जोर देते. आणि त्याच्या डोळ्यांत खोल बघते.

"अशी काय बघतेस् ?"

"माझी तुला नजर लागेल बघ राम !"

"नजर लागावी असं काय आहे माझ्यांत ?"

"पुष्कळ कांहीं !"

पोऱ्या डोकावतो. विचारतो—

"क्या लावूं साहाब ?"

"दो सामोसा, दो दहीवडा और गुलाबजामून !"

"राम, मी कांहीं खाणार नाहीं !"

"असं माझ्याकडे बघून पोट भरणार आहे कां ?"

"आज तसंच झालंय् खरं !"

"फिर लावूं क्या साहाब ?" पोऱ्या विचारतो.

"लावू लावू !" तो पोऱ्याला पिटाळून लावतो. पडदा सारखा करतो. आणि पँटच्या खिशांतून गोल्डफ्लेक्सचे पाकीट काढतो. त्यांतली एक सिगारेट ओठांत अलगद्शी ठेवतो. लायटर शोधूं लागतो तशी ती म्हणते—








अनुक्रमणिका

"खरें म्हणजे ही सिगारेट मोठी भाग्यवान्"

तो गालांतल्या गालांत हंसतो. लायटर काढून पेटवितो आणि ज्योतीचे टोंक सिगारेटवर भिडवितो. धुराचा भपकारा सोडून लायटर विझवितो. लायटरशीं चाळा करीत म्हणतो–

"पण तिला ओठांत जळण्याचं भाग्य मिळालं आहे !"

"स्त्रियांचं भाग्य त्यापेक्षां कमी नाहीं !"

"सूभाषित असं आहे – स्त्रियश्चरित्रम् – पुरुषस्य भाग्यम्" आणि तो पुन्हां हंसतो.

ती त्याच्याकडे किंचित् डोळे वटारून बघते. म्हणते–

"राम, तूं मोठा कठोर आहेस !"

"कसा ?"

"माझ्या पत्रांचीं उत्तरें तूं नियमित त्वरित देत नाहींस ! त्यामुळें मला किती मानसिक त्रास होतो म्हणून सांगूं ?"

"इथें मी तुझ्या भेटीसाठीं मुद्दाम येतो ना !"

"यावेळीं तूं अशी दाढी कां वाढविलीस् ?"

"तुझ्या विरहामुळें !"

लटक्या रागानं ती त्याच्याकडे बघते. म्हणते—

"मला नाहीं आवडत !"

"कां ?"

"जादूचे प्रयोग करणारा 'लाल' दिसतोस तूं !"

"माझे मित्र म्हणतात की दाढीमुळें मी खूपच रुबाबदार दिसूं लागलोय् म्हणून !"

ती त्याच्याकडे निरखून बघते.

त्याची गोरीपान उंचपुरी देहयष्टी तिला खूप आवडते. चोपून बसविलेले केस आणि जाड फ्रेमचा चष्मा. त्यामुळें चेहरा खूपच रुबाबदार दिसतो. पण ही दाढी—



"तसं फार दुखत नाहीं नां ?"....

ती बघतां बघतां मानेला हिसडा देते.

"आतां नेहमींकरतांच दाढी ठेवणार आहे मी !"

ती त्याचा हात हातांत घेते. किंचित् दाबून म्हणते—

"ए, असं नको करूस. तूं मला तसाच खूप आवडतोस !"

"असा आवडत नाहीं कां ?"

ती डोळे मोठाले करून त्याच्यावर रागावल्याच्या नजरेनं बघते.

तो मोठा ह्मक्कास हंसतो.

पोऱ्या ट्रेमध्यें डिशेस् आणतो. एकेक करून दोघांपुढें ठेवतो. निघून जातो. लगेच दुसरा पोऱ्या येतो. कांचेचा जार व पेले ठेवतो. आणि जाऊं लागतो तसा त्याला अडवून तो म्हणतो—

"देखो, अब बुलायेसिवा आना नही ! समझे ?"

"जी साहाब !" पोऱ्याला मोठें विचित्र वाटते. तो निघून जातो.

तो डिशेस्‌मधला एक सामोसा उचलतो. लचका तोडून खाऊं लागतो. खातां खातां किंचित् तोतऱ्या आवाजांत म्हणतो—

"खा नं !"

"मला कांहीं खायाची इच्छाच नाहीं बघ!"

"तुला जेवढं हवं तेवढं खा. बाकीचं माझं—

"ए, असं उष्ट खायचं नसतं—"

"कुणीं सांगितलं !"

"आईनं !"

"लहानपणीं. आतां तूं तरुण झाली आहेस. लहानपणीं जे करीत नव्हतीस तें आतां करीत आहेस!"

"म्हणजे नक्की काय !" ती पापण्यांची मजेशीर उघडझांप करून विचारते.

"प्रेम !"

ती पुन्हां डोळें वटारून बघते. त्याला तिच्या डोळे वटारण्याची मोठी मजा वाटते.

"तूं रागावलीस म्हणजे खूपच छान दिसतेस!"

"प्रियकराला प्रेयसी रागावली म्हणजे नेहमीच सुंदर दिसते. खंर म्हणजे तुझ्या ह्या असल्या बोलण्याचाच मला राग येतो!"

"म्हणजे आतां तूं खरेंच सुंदर दिसणार तर–"

ती रागारागानें सामोसा उचलते. अर्धा खाते. तो तिच्या हातांतला अर्धा सामोसा तिचें लक्ष नसतांना हिसकावतो आणि मटकावतो. तशी ती रागावून म्हणते–

"हे रे काय, असं उष्ट खायचं नसतं ना?"

"ये, सुंदर दिसूं लागलीस तूं!" बघ

"दिसूं दे !"

"ही उष्टें खायची पद्धत कशी रूढ झाली माहित आहे कां ?"

तिला त्याचे असे अनेक शोध माहित असतात. त्यावर ती खूप पोट धरून हंसलेली असते.

"कशी?" ती विचारते.

"चुंबनापासून!"

ती पुन्हां डोळे वटारते. म्हणजे—

"चुंबनाचा इथें काय संबंध?"

"फार मोठा. आज नाहीं तर उद्यांला ह्या प्रक्रियेंतून आपणांला जावंच लागणार आहे. तेव्हां त्याची पूर्वतयारी नको कां करायला?"

"राम, तूं मोठा वात्रट आहेस बघ!"

"आणि चावटहि !" तो तिच्या आवाजाची नक्कल करतो.

"निश्चितच. माझ्या पत्रांचीं उत्तरें कां देत नाहींस! मी खूप अस्वस्थ होते रे!"

"खरं कां ?" तो त्याच गंमतीच्या सुरांत विचारतो. तिचा मात्र चेहरा रडवेला होतो.

"आतां तूं रडणार आहेस कां? मला प्रथम सांगून ठेव. म्हणजे खाणें बाजूला ठेवून मी रुमाल शोधतो."

ती रिकाम्या झालेल्या डिशमध्यें उष्टचा बोटांवर मोजकें पाणी टाकून हात धुते. इवल्याशा रुमालानें हात पुसते. आणि तो रुमाल त्याला देत म्हणते—

"कशाला शोधाशोध करतोस? हा घे—"

तो उष्टचा हातानेंच तो हिसकावून घेतो तशी ती म्हणते—

"खैंराब केलस ना ?"

"खाणें झाल्यावर तुझ्या साडीच्या पदरानें हात तोंड पुसणार आहे मी!"

"असं नको करूंस रे!"

"महागडी साडी चुरगळेल, नाहीं? शिवाय हिरवी साडी—"

तो मिस्कीलपणें तिच्याकडे बघतो. ती त्यावर कांहीं बोलत नाहीं. तो खाणें संपवितो. हात धुतो. आपल्या खिशांतल्या रुमालानें हात पुसूं लागतो. रागावल्या चेहऱ्यानें तिच्याकडे बघून.

"रागावलास ना ?"

ती उठते. आणि त्याच्याजवळ येऊन आपल्या पदरानें त्याचे ओंठ पुसते.

"आपण यापूर्वी चुंबन घेतले कां ?"

ती रुष्ट नजरेनं त्याच्याकडे बघते. तो मिस्कील हंसून म्हणतो—

"मला कांहीं आठवत नाहीं. पदरानें ओंठ पुसल्येस म्हणून विचारले!"

"तुला चुंबनाची अलिकडे खूपच स्वप्नें पडूं लागली आहेत!"

"होय. तुझ्या रूपाची एक स्त्री माझ्या स्वप्नांत येते. तिचें सारें शरीरच ओठाएवढे होतें. आणि मग तिचे ओठ तिच्या शरीरा-एवढे होतात. माझें चुंबन घेतात. मी मात्र तिच्या त्या ओठांत पुरतां सामावून जातो."

"छान कल्पना आहे. आतां लौकर आटपा बरं!"

"इथेंच?"

ती मोठाले डोळे करून म्हणते—

"मी बाहेर पडण्याविषयी म्हणते महाराजा!"

तो हंसतो. कॉलबेल दाबतो.

पोऱ्या येतो.

"दोन कप चहा आण. 'क्वालिटी'!"

पोऱ्या निघून जातो.

ती कांहींशी अस्वस्थ होते. कुठें तरी शून्यांत एकटक बघते. पोऱ्या चहाचे पेले टेबलावर ठेवतो तरी तिला त्याची चाहूल नसते.

"कसला विचार करते आहेस?"

ती भानावर येते. कसनुसें हंसते. म्हणते—

"कांहीं नाहीं!"

"चहा घे! विचार कसला करीत होतीस?"

'तुझा!"

"मी पुढ्यांत असतांना माझाच विचार?"

ती अतिशय गंभीर आवाजांत म्हणते—

"वाटतं, मी मृगजळामागें धांवते आहे कीं काय?"

"कशी?"

"तूं गंभीरपणें कधीं बोलशील असें वाटत नाहीं. जेव्हां केव्हां तुझ्या भेटी होतात त्या अशाच! बऱ्याचदां विचार करते—तुला कांहीं विचारावं, पण प्रत्येक भेटींत तें मागें पडतं. आणि मग मी तुझ्या पुढल्या भेटीची आतुरतेनें वाट बघते. अतिशय अस्वस्थ वाटूं लागलं कीं, तुला पत्र खरडते. आणि तूं मात्र माझीं पत्रें अनुत्तरित ठेवून मला रखडत ठेवतोस !"

तो खूप हंसतो. शोभणार नाहीं इतका मोठा आवाज करून. तिला मात्र अवघडल्यासारखं वाटतं. वाटतं—इतकं गंभीर बोलून आपण चूक केली. मूर्खपणा केला. आपल्या गांभीर्याचा त्याच्यावर कांहींच परिणाम नाहीं.

ती रडवेला चेहरा करून चहा पिते.

"चहा पितांना रडूं नकोस. नाहीं तर गालांवरले आंसू पेल्यांत पडतील आणि चहा कधींच संपणार नाहीं."

तो तिचा इवलासा रुमाल तिच्यापुढें धरतो—

"हा आंसू पुसण्यासाठीं !"

ती खोचकपणें म्हणते—

"आपलें आंसू आपणच पुसायचे असतात. आण तो रुमाल!" ती चहाचा रिकामा पेला खालीं ठेवते. पापण्यांच्या कडा किंचित् पाणावल्या असतात त्या पदरानें पुसते. उठून उभी राहते. पर्स उघडून त्यांतली एक दहाची नोट काढून म्हणते—

"बिल मी देणार!"

"कमाई करणाऱ्यांनींच बिलें चुकवायची असतात."

"मी कमाई करीत असते!"

तो प्रश्नार्थक मुद्रेनं तिच्याकडे बघतो.

"मी शिक्षिकेची नोकरी पत्करली आहे!"

"आणि हे आतां सांगत्येस?"

"कांही गोष्टींचा थांगपत्ता लागूं द्यायचा नाहीं हें तुझ्यापासून शिकले!"

'मुलींना हेंच शिकवित असतेस कां?"

"बाहेर चल प्रथम !"

ती दोघेहि 'कंपार्टमेंट'मधून बाहेर पडतात.

तो तिला बिल देऊं देत नाहीं. तिच्या हातांतली नोट हिसकावून घेतो आणि आपल्या पाकीटांतले पैसे देतो.

ती दोघेहि जिना उतरून रस्त्यावर येतात.

तो सिगारेट पेटवितो. लायटरशी चाळा करीत तिच्याकडे न बघतां विचारतो—

"आतां आपला पुढला कार्यक्रम?"

ती कसला तरी विचार करीत रस्त्यावरल्या गर्दीत हरवल्यागत बघत असते.

"काय बघत्येस?"

तिच्या चेहऱ्यावर हंसूं उमटतं. ती कांहीं बोलत नाहीं. चटकन् एका रिक्षावाल्याला बोलावते. रिक्षावाला अगदीं जवळ रिक्षा उभी करतो.

"दो सवारी छोटी घंतोली! सहा आणे देऊं. हो कीं नाहीं त सांग!"

"बसा!"

ती त्याच्याकडे बघते. म्हणते—

"बसा."

"कुठें?"

"माझ्या घरीं!"

"घरीं नंतर जाऊं! आणखी खूप भटकायचं आहे!"

"ठीक आहे. रिक्षांत तर बैस!"

"पायींच भटकूं!"

"रिक्षा ठरवलाय्!"

"पण मला पहिल्यांदा विचारायला नको? मी तुला विचारलं तेव्हां तूं आपल्या समाधींत हरवलेली ! कसला गहन विचार करीत होतोस?" ती त्याचा हात धरून त्याला रिक्षांत बसायला भाग पाडते. ती त्याच्या बाजूला बसण्यासाठीं प्रयत्न करते तसा तो उजवीकडली जागा मोकळी करतो. ती थोडी त्याच्यावर रुष्ट होते. परंतु त्याला अगदीं खेटून बसते.

रिक्षा सरकते.

"मी काय विचारले?" तो विचारतो.

"राम, आपण मघांपासनं कसें भटकत आहोंत?" ती एखादे कोडे घालावें त्या सूरांत विचारते.

"कसें?" तो उलट तिलाच विचारतो.

तिचा चेहरा लाजेनें लालीलाल होतो.

"आणि अशी गोरीमोरी कां झालीस!"

ती हलक्या आवाजांत म्हणते—

"कुणाला वाटेल कीं आपण नवरा-बायको आहोंत. नाहीं?"

तो नेहमीसारखा खो खो करीत हंसूं लागतो. तिच्या चेहऱ्यावरला उत्साह त्याच्या हसण्यानें मावळतो. आणि ती दुखावून जाते. ती त्याच्याकडे न बघतां दुसरीकडे बघूं लागते.

"रागावलीस ना?"

ती मुळींच बोलत नाहीं. तो तिच्याकडे त्याच हंसऱ्या चेहऱ्यानें बघत असतो.

ती रिक्षावाल्याला निश्चित जागा सांगते. थोड्या वेळांत रिक्षा तिच्या ब्लॉकपाशीं थांबते.

ती चटकन् उतरते. पर्स उघडून पैसे काढूं लागते. तो दहाची नोट चटकन् तिच्या पर्समध्यें टाकतो आणि कांहींच न केल्यासारखा दुसरीकडे बघतो.

ती रिक्षावाल्याला पैसे देते.

तो तसाच रिक्षांत बसून असतो. त्याच्या नेहमींच्या ह्या वागणुकीनें आतां मात्र ती त्रस्त होते. चिडूनच विचारते—

"उतरणार नाहींस कां?"

तिच्या आवाजाची नक्कल करून तो म्हणतो—

"नाहीं!"

"असाच बसून राहतोस कां?"

"तूंही बैस!"

"कुठें जायचे!"

"भटकूं आणखी!"

"होऊं दे तुझ्या मनानं!" ती त्याच्या शेजारीं आदळल्यागत बसते. तसा तो म्हणतो—

"इकडे बैस. माझ्या डाव्या हातावर!"

त्याच्या त्या बोलण्यानें वास्तविक ती सुखावून जाते. परंतु त्याच रुष्ट आवाजांत म्हणते—

"इथेंच बरी!"

त्यांच्यातल्या संभाषणानं रिक्षावाल्याला हंसूं येतं. तो हंसऱ्या चेहऱ्यानं विचारतो—

"कुठें चलायचं साहेब?"

"बाईसाहेब सांगतील!"

"मला नाहीं माहीत!" ती रागानें रिक्षावाल्याला म्हणते.

"तासाचे काय घेशील!" तो विचारतो.








"दीड रुपया!"

"अंबाझरी चल्"

"कशाला?" ती विचारते.

"जीव द्यायला!" आणि तो लगेच रिक्षावाल्याला विचारतो—

"पाणी आहे ना रे अंबाझरीला!"

"हो साहेब. खूप पाणी आहे!" रिक्षा वळवून तो चालवूं लागतो. तो तिला म्हणतो—

"आहे म्हणतात. जीव द्यायला हरकत नाहीं!"

तिच्या डोळ्यांच्या कडा पाणावतात. आणि दोन टप्पोरे थेंब गालांवर निथळतात.

तो झटकन् रुमाल काढतो. तिच्या गालांवरलें आसूं टिपतो. ती पुसूं देते. तो म्हणतो—

"आपलें आसूं आपणच पुसायचे नसतात."

"तूं माझा पुरतां छळ करतोस राम!"

"याला छळ म्हणतेस! वेडी आहेस!"

"वेडी म्हण. कांहींहि म्हण!"

"वेडी नाहींस तर काय? अग ही मजा नंतर कशी काय येणार?"

"नंतर? हा नंतर आयुष्याचा उतरणीला येणार आहे वाटतं!"

तो नुसता हंसतो. मिस्कीलपणें.

"मला तुझं हे वारंवार हंसणं मुळींच आवडत नाहीं!"

"मी आवडतो ना?"

ती अनुरागानें त्याच्याकडे बघते. तो पुन्हां हंसतो—हंसत हंसतच म्हणतो—

"अग, हंसण्याइतकं सुख रडण्यांत आहे कां?"

"पण तूं सगळ्या गोष्टी हंसण्यावर नेतोस. कधीं तरी तूं गंभीरपणें विचार करशील यावरला माझा विश्वास उडत चाललाय्. बऱ्याच दिवसाच्या मध्यंतरानंतर तुझी भेट होते. त्या भेटींत तूं हंसण्यापलिकडे कांहींच करीत नाहींस! मला सारं हें असह्य होत आहे. आणि आईचा लकडा आहे तो वेगळाच!"

"अशी घाई करूं नकोस. लग्नाबद्दलच म्हणतेस ना? होईलच कधीं तरी! त्यांत एवढं गंभीरपणें विचार करण्यासारखं काय आहे?"

"हंसण्यावर नेण्याइतका पोर खेळ आहे तो!" ती खोचक बोलते.

"correct!" तो पुन्हां हंसूं लागतो. हंसतां हंसतां म्हणतो—

"निदान माझ्या आईवडिलांना तरी वाटतो!"

"तुलाहि वाटतो!"

"एक गंमत सांगू?"

ती त्याची गंमत ऐकण्यास मुळींच उत्सुक नसते. तो मोठ्या उत्साहानें सांगतो—

"दोन मुली सांगून आल्या होत्या!"

"ऐकूं आलं!" ती तुसड्यागत बोलते.

"दोघीहि सुंदर आहेत. एक तर खूपच सुंदर आहे. तुझ्यापेक्षां किती तरी पटीनें!"

## राबो कलेवर

जन्माच्या बोलीने । दुःखाशी करार
कशासाठी हार । मग खाणे ॥१॥
रोज नवी खंत । नित्य नवी भ्रांत
याला सरावले । आतां जिणे ॥२॥
स्वप्नांना केव्हांच । दिली मूठ-माती
चालते बोलते । झालो प्रेत
आतां कलेसाठी । राबो कलेवर
आणि कवितेंत । राहो 'हेत'

—सदाशिव करंदीकर

"मग होकार द्यायचा!" ती आवंढा गिळून म्हणते.

"तुझा सल्ला हवाय्!"

"माझ्यापेक्षां सुंदर आहे तर त्यांत माझा सल्ला कशाला?"

"व्वा, आपल्या जिव्हाळ्याच्या माणसाचा सल्ला केव्हांही आपल्या भल्याचाच राहणार. तुझें काय मत आहे?"

तिचा जीव कासावीस होतो. चेहऱ्यावर अनेक भाव उमटून जातात. कुणी तरी कोंडी केल्यासारखें तिला वाटूं लागतें. श्वास गुदमरल्यासारखा होतो. दीर्घ श्वास ओढून ती कसेंबसें म्हणते—

"होकार कळव!"

"आणि तिच्यापेक्षां एखादी सुंदर मुलगी भेटली तर?"

"मुली रस्त्यावर पडल्या आहेत कां?" ती चिडून विचारते. आणि तो खो खो करून हंसतो. किती तरी वेळ. हंसतां हसतां रिक्षावाल्याला म्हणतो—

"अरे भाई रिक्षा पलटाव्!"

"अंबाझरी नहीं चलोगे?"

"अभी मरनेका नही. लिबर्टी चलो!" चलतेस ना—

"पिक्चरला, 'बॅचलर्स फ्लॅट' लागला आहे!"

"मला माझ्या फ्लॅटवर सोडून दे प्रथम!" ती रडकुंडीस येते. तो तिच्याकडे मिस्कील बघतो. रिक्षावाल्याला म्हणतो—

"वापिस चलो. आये वहापर!"

"याने 'कोहिनूर' के पास?" रिक्षावाला विचारतो.

"हां!"

तिच्या पापण्यांच्या कडा कणाकणानें ओलावतात. पुन्हां गालांवर टप्पोरे थेंब निथळतात.

तो गालांतल्या गालांत हंसतो. आपला रुमाल देतो. तशी ती आपल्या पदराच्या टोकानें आसूं पुसते.

हंसून हंसून त्याच्या डोळ्यांत पाणी येतं. तो चष्मा काढून रुमालानें ते पुसतो. म्हणतो—

"आपलें आसूं आपणच पुसायचे असतात. नाहीं कां?" आणि लगेच रिक्षावाल्याला म्हणतो—

"चलरे भाई जहासे आये थे वहा!"

रिक्षावाला रिक्षा वळवितो.

ती त्रस्त चेहऱ्यानें त्याच्याकडे बघूं लागते आणि ती तशी बघते म्हणून त्याला हंसण्याच्या उकळ्या फुटतात. ●●●

# सो ब र्स चें क्रि के ट

फलंदाजींत वैयक्तिक जागतिक विक्रम करणारा **गारफिल्ड सोबर्स्** ऐन उमेदींत वेस्ट-इंडिज संघाचा कर्णधार झाला आहे तो केवळ आपल्या अंगच्या गुणांच्या जोरावरच! कर्णधार सोबर्स् आतां आपल्या ह्या गुणांच्या बळावर येणाऱ्या ऑस्ट्रेलियन संघाशीं कशी लढत देतो ह्याकडे क्रिकेट रसिकांचं लक्ष लागलं आहे....

—दि. श्री. कराडकर



**एखादा** मंदबुद्धीचा विद्यार्थी बुद्धीनें एकदम तल्लख बनावा व वर्गांत पहिला नंबर पटकविण्यासाठी त्याची चाललेली धडपड पाहून सगळ्यांचें लक्ष एकदम त्याच्याकडे जावे, अगदीं अशीच स्थिती जागतिक क्रिकेट-मध्यें सध्यां वेस्ट-इंडिजची झाली आहे. पूर्वीं इंग्लंडच्याही खालोखाल असलेला हा संघ गेल्या कांहीं वर्षांत इतका प्रबळ झाला कीं इंग्लंडला पाणी पाजून क्रिकेटमधील सम्राट म्हणून ज्याचा यथार्थानें गौरव करतां येईल त्या ऑस्ट्रेलियन संघाला त्यानें आतां आव्हान दिले आहे. वॉरेलच्या नेतृत्वाखालीं गेलेल्या संघानें दोन वर्षांपूर्वी ऑस्ट्रेलियांत सलामीची फैर झाडली. आतां ऑस्ट्रेलियाचा संघ वेस्ट इंडिजमध्यें जातोय्. त्यावेळीं ह्या द्वंद्वयुद्धाला आणखी मजा येणार आहे. आतां वेस्ट इंडिजचा संघही नव्या दमाचा आहे, शिवाय कप्तानहि नव्या उमेदीचा आहे. त्यांचं नांव आहे— गॅरी सोबर्स !

गॅरी सोबर्सचा क्रिकेटविषयक दृष्टिकोन नाविन्यपूर्ण आहे. विशेषतः वेस्ट-इंडिजचं स्वतःचं असं क्रिकेट आहे असं त्याचं म्हणणं आहे. पण ते वेगळं आहे असं मात्र नाहीं. तो लिहितो, "कॅरिबियन क्रिकेट.....हें जगापेक्षां वेगळं आहे कां ? ते वेगळं नाहीं पण त्याला स्वतःचं व्यक्तिमत्व आहे हे निश्चित. ह्या बेटांतून तरणीताठी मुलं क्रिकेटची धर्मा-प्रमाणें जपणूक करतात. मी तरी निदान एके काळीं अशी जपणूक केली आहे. ह्या खेळासंबंधीं धड कुठें शिकवणही मिळाली नसतां, केवळ खेळाविषयीं दाखविलेल्या अमाप उत्साहापोटींच मला ह्या खेळांत घवघवीत यश संपादन करतां आलं. 'क्रिकेट, क्रिकेट' असा एकच माझा ध्यास असे. म्हणूनच आजच्या तरुण खेळाडूंना मी एकच सांगत असतो, 'मिळेल त्या मिनिटाचा फायदा घेऊन क्रिकेट खेळा.' कारण मी हे केलेलं आहे. मला आठवतंय्, दिवसांकाठीं आठ-आठ तास मी टेनिसचा चेंडू फेंकण्याचा नुसता सराव करीत असे. लहानपणीं टेनिसच्या चेंडूनें क्रिकेट खेळण्यांत मला कसलीच लाज वाटत नसे. तुम्हींही न लाजतां बेधडक टेनिसच्या चेंडूनें क्रिकेट खेळत चला. टेनिसच्या खेळानें एक गोष्ट पक्की बनते. ती ही कीं – 'हा चेंडू आपल्याला दुखापत करील.' ही भीति आपल्या मनांतून पार निघून जाते. एक प्रकारची मानसिक तयारी होते. विशेषतः माझी तरी झाली. कारण पुढें जेव्हां मी सीझन चेंडूनें खेळूं लागलों तेव्हां हा चेंडू आपल्याला दुखापत करील ही भीतीच माझ्या मनांतून समूळ नष्ट झाली होती. मी बेधडक खेळूं लागलो. मारलेले फटके इतके जोरकस ठरत कीं, चेंडू दूर जाऊं लागला. जो फलंदाज निर्भय मनानें खेळूं शकतो तोच धांवा जमवूं शकतो. १९५३ सालीं मी जेव्हां अव्वल दर्जाचे क्रिकेट-सामने खेळूं लागलो तेव्हां जगांतील वेगवान गोलंदाजांची गोलंदाजी मी कौशल्यानें खेळूं शकलो ती केवळ माझ्या मनाची वरीलप्रमाणें पार्श्वभूमी तयार झाली

होती म्हणूनच. वास्तविक पाहतां मला असं सांगण्यांत आलं होतं कीं, मिलर व लिंडवॉल ह्यांच्या गोलंदाजीमुळें मला दुखापत होणारच होणार. ह्यामुळें माझ्याही मनांत थोडी दहशत निर्माण झाली. पण मनाची तयारी पक्की करण्यासाठीं मी 'नेट्स' लावून वेगवान गोलंदाजीवर खेळण्याची संवय करूं लागलों. अगदीं 'पॅडस', 'ग्लोव्हस्' वा कुठल्याहि तऱ्हेचा संरक्षक संभार न चढवून. तुमच्या मनाची जिद्द पाहिजे. 'चेंडू मला लागणारच नाहीं' म्हणून. बस् ! मी ह्या धुंदीतच संवय करूं लागलो; आणि काय आश्चर्य ? प्रत्यक्षांत जेव्हां ते दोन वेगवान गोलंदाज गोलंदाजी करूं लागले तेव्हां मी निर्भयपणें त्यांची गोलंदाजी खेळूं लागलो. मला असं कधींच वाटलं नाहीं कीं, ह्यांचा एखादा चेंडू माझं टाळकं शेकेल म्हणून."

सोबर्स् क्रिकेट एकलव्याच्या तंत्रानें शिकला. म्हणजे गुरुचा पुतळा साक्षीला ठेवून त्यानें धडे घेतले. म्हणजे काय केलें ? ह्याचं उत्तर एकच कीं, मोठमोठ्या क्रिकेटपटूंचा खेळ त्यानें अभ्यासू दृष्टीनें अवलोकिला. एव्हर्टन विक्स्, फ्रँक वॉरेल व रॉय मार्शल ह्या तीन 'बार्बेडियन' वीरांचा खेळ त्यानें नजरेंत सांठवला आणि तो त्याच सफाईनें आपल्या मनगटांत उतरवला ! कुठल्याच प्रकारची शैक्षणिक साधनें उपलब्ध नसलेला सोबर्स लिहितो —"जे दृष्टीस पडेल ते मनांत सांठवायचं आणि त्यांतून स्वतःचं ज्ञान वाढवायचं असा माझा खाक्या होता." एवढं लिहून पुढें शोधक वृत्ती संबंधी सोबर्स म्हणतो कीं "You should try and do something of everything."

क्रिकेटची दिवसेंदिवस प्रगति होत आहे हे सोबर्सनें आपल्या लेखांत प्रांजलपणें कबूल केलें आहे. आजकाल इंग्लंडमध्यें व ऑस्ट्रेलियामध्यें हा खेळ इतका प्रगत झाला आहे कीं, ह्या खेळांतील प्रत्येक शाखेंत (department) 'खास नैपुण्य' संपादन करून खेळाडू तयार होत आहेत. त्यामुळें आज 'All-rounder'चा जमाना राहिलेला नाहीं. सोबर्सला हें मान्य आहे. तो लिहितो, "माझं स्वतःचंच उदाहरण घ्या. एक मामुली डावखुरा फसवा गोलंदाज व फलंदाजींत नवव्या क्रमांकाचा फलंदाज म्हणून मी माझ्या क्रिकेटमधील जीवनाला सुरुवात केली. पण पुढें झपाट्यानें प्रगति झाली ती माझ्या फलंदाजींत, गोलंदाजींत नव्हे, आणि तशी प्रगति करून घेणें हा माझा एक शहाणपणाच ठरला. मी मग माझी दिशा ओळखून फलंदाजींतच अधिक प्राविण्य संपादन करूं लागलों. पुढें धांवा 'जमविण्यांत' मला विशेष मेहनत घ्यावी लागत नसे व 'वेस्ट-इंडिज'च्या कसोटी संघांत माझा सहजगत्या प्रवेश झाला. परंतु केवळ नैपुण्यावर मी संतुष्ट नव्हतो. म्हणून गोलंदाजीवर मी 'काळजीपूर्वक' लक्ष देऊं लागलो. माझ्यांतले दोष मीच शोधूं लागलो; आणि ते मला सांपडले. मी सुखावलो. आज माझ्या भात्यांत दोन 'रामबाण' आहेत, एक फलंदाजीचा, दुसरा गोलंदाजीचा ! प्रत्येक खेळाडूला फलंदाजी व गोलंदाजी चांगली करतां आली पाहिजे, निदान असा समज प्रत्येक वेस्ट-इंडिज खेळाडूचा झालेला दिसतोय्. त्यामुळें त्याच्या सुरुवातीच्या आयुष्यांत तो ह्या दोहोंत चांगली गती मिळवितो. पण क्षेत्ररक्षणांत अगदीं कुचकामी ठरतो. केवळ तिकडे दुर्लक्ष केल्यामुळें ! ही एक मोठी चूक आहे. वेस्ट-इंडिजच्या नव्या पिढीनें ही चूक सुधारणें आवश्यक आहे."

नव्या उमेदीच्या खेळाडूंना उपदेश करतांना सोबर्सनें लिहिलें आहे, "तुमच्या आयुष्यांतील महत्वाची गोष्ट कोणती जर असेल तर ही कीं तुमची चूक तुम्हांला स्वतःला ओळखतां आली पाहिजे. ज्यावेळीं तुम्हीं बाद व्हाल त्या त्या प्रत्येक वेळीं विचार करा कीं, मी बाद कां झालो ? एकदां चूक कळली कीं, ती सुधारण्याचा प्रयत्न करा. ह्यासाठीं तुम्ही 'नेट' लावून जेव्हां संवय करतां, तो संवयीचा खेळ कसा खेळावा हे मी सांगतों. जो चेंडू तुम्हांला चोपतां येतो, तो 'नेट'च्या वेळीं चोपण्यांत धन्यता मानूं नका. पण जो चेंडू घड आहे, जो प्रत्येक वेळीं तुमचा हटकून बळी घेतो, तोच, अगदीं तसाच चेंडू गोलंदाजाला टाकायला तुम्ही सांगा. अगदीं खूप वेळ तो तशी गोलंदाजी करूं दे, नंतर तो 'फसवा' चेंडू तुम्ही ओळखूं लागाल. हळूं हळूं तसा चेंडू सीमेपार हाणण्यांत तुम्ही तरबेज व्हाल. पूर्वी माझ्या स्वतःच्या फलंदाजींत फार दोष होते. मी ते सगळे दोष नीट हेरले आणि ह्या पद्धतीनें हळूं हळूं नाहीसे केले."

उत्कृष्ट फलंदाज तोच कीं, जो कोणत्याही 'विकेट' वर उत्कृष्ट फलंदाजी करूं शकतो. सोबर्सनें आज जो उत्कृष्ट फलंदाज म्हणून लौकिक मिळविला आहे त्याच्या मागें त्याची 'लँकेशायर' परगण्यांतील तपश्चर्या आहे. 'लँकेशायर'मधून तो खूप सामने खेळला आणि अनुभवानें चांगला समृद्ध बनला. कारण 'लँकेशायर'मध्यें जशी 'विकेट' असते तशी कसोटी सामन्यासाठीं जगांत इतरत्र कुठेंच नसते. ह्या 'विकेट'वर तुम्हांला प्रत्येक चेंडू त्या चेंडूची जात ओळखून खेळावा लागतो. आणि ह्यासाठीं मनाची एकाग्रता लागते. डाव उभारण्यासाठीं एकाग्रता हा काय गुण आहे हे पटतं. 'लँकेशायर' परगण्यांत सोबर्स असा तयार झाला !

ही एकाग्रता गोलंदाजी टिपण्यांत कशी मदत करते ह्याचं विवरण करतांना सोबर्स लिहितो, "फलंदाजीसाठीं तुम्ही क्रीडांगणावर आलांत कीं, पहिली वीस मिनिटें जेव्हां जेव्हां संधी मिळेल तेव्हां तेव्हां गोलंदाजी व विकेट हेरण्यांत घालवा. ह्याचा अर्थ धांवा



तुम्ही शीळ घातलीत – मी थांबले, पुढें काय ?

जमवायच्या नाहींत असा नव्हे. कोणी सांगावं, तुम्ही नशीबवान असलां तर त्या वेळांत सहा चेंडू असे रद्दड मिळतील कीं ज्या मुळें तुम्हाला २४ धांवा सहज जमवतां येतील ! फलंदाजी करतांना गोलंदाज कोणत्या प्रकारची गोलंदाजी टाकतोय् हें ओळखता आलं पाहिजे. ह्यासाठीं तुमचं लक्ष गोलंदाजावर केंद्रित हवं. त्यानें चेंडू कसा पकडला आहे ? तो चेंडू कसा टाकतो, कुठला टप्पा गांठून तो चेंडू हातांतून सोडतो ? चेंडूला हवेंत गति प्राप्त होण्यासाठीं तो कांहीं विशेष करामत करतो कां ? कांहीं गोलंदाज आपल्या विशिष्ट लकबीमुळें फलंदाजांना तंग करतात. उदाहरणार्थ, सॉनी रामाधीन ! सॉनीनें इंग्लिश फलंदाजांना काय कमी सतावलंय् ? अजूनही इंग्लंडच्या कांहीं 'ग्रेट' खेळाडूंनीं सॉनीला पुरता ओळखला नाहीं. माझी स्वत:चीच गोष्ट घ्या ना. गुप्तेची गोलंदाजी खेळतांना माझी भंबेरी उडत असे. हा भारतीय फसवा गोलंदाज दोन प्रकारचे 'गुगली' चेंडू टाकीत असे कीं, ज्यांची फेंक अगदीं सारखी असे; त्यामुळें चेंडूची फेक कोणत्या प्रकारची आहे हे ओळखणं मला कठीण जाई. चेंडू जेव्हां हवेंत येई तेव्हांच तो कसा आहे हे ओळखण्याची मी धडपड करी."

आपल्या लेखाच्या शेवटीं सोबर्स क्षेत्ररक्षणाकडे वळला आहे. त्यासंबंधीं तो लिहितो, "इतर देशांत क्रिकेट खेळतांना मी जेव्हां जेव्हां क्षेत्ररक्षण केलं तेव्हां तेव्हां ते फक्त 'स्लिप'मध्यें केलंय् ! क्षेत्ररक्षणासंबंधीं मी इतकंच म्हणेन कीं, जिथें तुमची जागा निश्चित करण्यांत आली आहे तिथून चेंडू पुरता खेळला जाईपर्यंत हलूं नका. लक्षांत ठेवा जलद्गतीनें पुढें सरकणं सोपं आहे पण मागें सरकणं सोपं नाहीं. नजर बॅटीच्या हालचालीवर असूं द्या, चेंडूच्या नाहीं ! आणि येणाऱ्या चेंडूवर झडप मारूं नका. तुम्ही चेंडूकडे जाण्याऐवजीं, चेंडू तुमच्याकडे येऊं दे आणि भांबावून न जातां चेंडू पकडा व चपळाईनें यष्टिरक्षकाकडे तो फेका. तुमची ही चपळाईच सामने जिंकायला मदत करीत असते."

फलंदाजींत वैयक्तिक जागतिक विक्रम करणारा गारफिल्ड सोबर्स ऐन उमेदींत वेस्ट-इंडिज संघाचा कर्णधार झाला आहे तो केवळ त्यानें ह्या लेखांत ठिकठिकाणीं विशद करून सांगितलेल्या गुणांच्या जोरावर ! कर्णधार सोबर्स आपल्या ह्या गुणांच्या बळावर येणाऱ्या ऑस्ट्रेलियन संघाशीं कशी लढत देतो ह्याकडे आतां क्रिकेट रसिकांचं लक्ष लागलं आहे. ● ● ●





अनुक्रमणिका

# मागीलदार......

-रविंद्र पिंगे



असें हें जीवनानंदाचा प्रकाश प्राणांवर शिंपडणारें मागीलदार ! बहुगुणी, बहुचणी, सोशिक आणि सोशिस्कर सुद्धां....

**आकानें** झिराडला घर घेतल्यामुळें अनेकांना अनेक प्रकारें आनंद झाला. उसें टेकायला हक्काची जागा झाली म्हणून तिच्या म्हाताऱ्या वावांनीं आनंदानें श्वास टाकला. यापुढें येणाऱ्या प्रत्येके सुटींत गांवीं जाऊन बैलं पिटाळायला मिळतील, म्हणून पोरांच्या कानांत वारा शिरला. आमच्या आवारांत चिंचा बोरांची घरती झाडं आहेत ही वातमी फुटतांच शाळकरी मुलींच्या जिभा लाळावल्या. आटत चाललेल्या पांढरपेशा वस्तींत एका नांदत्या कुटुंबाची भर पडली, म्हणून पेन्शनीतलीं उतरतीं उन्हं खात बसलेल्या म्हाताऱ्या मंडळींना चांगलाच धीर आला. जियें कुंभाराची गाढवं लोळत तिथें दिवा लागणार, म्हणून ज्या म्हातारीनें ही गहाणवटींतली वास्तु आम्हांला विकली, तिलासुद्धां भलें-भलें वाटलें. स्वतःचं घर झाल्यावर सारेजण हुशारले. आनंदाच्या भरांत आम्ही एक फक्कडसा सत्यनारायणहि ठोकला ! घरांत दिवा लागला, तसा राबताहि वाढला. मिळेल ती मासळी आमच्या घरीं खपूं लागली. बैदेवाल्याला रोखीचें गिऱ्हाईक लाभलें. मुळांत आमच्या घरांत पोरांची चिल्लर जास्तच. साहजिकच उष्ट्याखरकट्याचा रांधाहि सांजसकाळ उदंड. त्याचा चट्टामट्टा करायला गांवची कुत्रीं दिवसभर दारांत लोळूं लागली. चुलीच्या उबेला मांजरं बसलीं. बांधावरल्या डांळींबीणीला पोटभर चूळपाणी मिळालें. आम्हांला नकळत एके दिवशीं तिच्या शिखेवर लालस-शेंदरी फूल डुलूं लागलें. आणि तेव्हांपासून त्या फुलांतल्या रसावर टूक धरून एक देवकावळा चिंचेच्या फांदीवर सांजसकाळ बसूं लागला. कुठल्या ना कुठल्या कारणानें प्रत्येकाच्या मनावर आनंदाची फुंकर पडली. मला मात्र उमाळा आला फक्त एकाच गोष्टीमुळें; निवांतपणें बसायला मला हक्काचें मागीलदार मिळालें हीच माझ्यापुरती आनंदाची परमावधी होती.

तसें पाहिलें तर कुठल्याहि घराचें पुढीलदार नव्या नवलाईच्या जांवईबुवांप्रमाणें भपकेदार वाटतें. त्या मानानें मागीलदार माधुकरी मागणाऱ्या मुलाप्रमाणें ओशाळलेलें दिसतें. आमच्या घराचें मागीलदार ठेंगणें आहे. जुनें आहे. हें घर अगदीं सुरुवातीला जेव्हां बांधलें तेव्हांच्या ज्या अगदीं थोड्याच वस्तू आतां शिल्लक असतील, त्यांच्यापैकीं हें मागीलदार आहे. गांवठी लाकडाच्या फळकुटांपासून तें बनवलेलें आहे आणि त्याच्यावर धुराचा थरहि सांचलेला आहे. निजायच्या अगोदर कोयंडा घालून आम्ही तें लावून घेतों खरें, पण तें इतकें कुचकामी आहे कीं एका लाथेंत धाप्‌कन खालीं कोसळेल. पण तरीहि मला आपलें तेंच आवडतें. कारण मागीलदार म्हणजे केवळ नांवाप्रमाणें दोन फळकुटांचा आडोसा नव्हे. त्या शब्दाचा अर्थ अधिक व्यापक आहे. "पारिजात" ह्या इटुकल्या शब्दांत ज्याप्रमाणें प्राजक्ताच्या डहाळीवर डुलणारी रसघ फुलें, लहानपणीं कीर्तनांत ऐकलेला रुक्मिणीच्या अंगणांत पडणारा त्या पुष्पदलांचा सडा, त्या रोपासभोंवतालचा सुगंधी कोष, त्याच्या अंगाखांद्यावर पुनवरातीं चिकटणारा चांदण्याचा ठिबकता ओला वर्ख, उन्हांत झिरमिळणारा त्याचा शेलाटा बांधा, पायतळीं पुरलेल्या कुळपुरुषाच्या अस्थींवर सदैव पडणारी त्याची मऊ छाया, ह्या सर्व भावावशेषांचा समावेश होतो, त्याचप्रमाणें मागीलदार म्हणजे घरामागचें अंगण, तुळशीवृंदावन, विहीर, विहिरीच्या बांधावरलें शेंवाळ, केळीचे वाफे, परसूं, निवडुंगाची वई, असें सारेंसारें विश्व त्यांत आलें. अगदीं चिंचेवर चढणारी खारुद्रीसुद्धां त्यांत समाविष्ट आहे.

आमच्या घराच्या पुढीलदाराची मिजास मोठी मारू आहे. काच्याचें दुटांगी धोतर नेसलेल्या उमेदवारासारखी त्याला स्वतःची म्हणून कांहींएक ऐट आहे. पातळ रेघांच्या पडवींत दाराची तुकतुकीत सागवानी चौकट भक्कम बसवलेली आहे. कारागीरीतलें कसब अंगावर मिरवणारें नक्षीदार दार त्या चौकटींत बसवलें आहे. पितळी कडीचा अलंकार त्याला सुभग शोभून दिसतो. त्या दारासमोरच निखळ शेणानें परत परत सारवलेलें चौकोनी अंगण आहे. त्यावर पेंढ्यांचा मांडव आहे. घरासमोर एकाच हांकेवर समुद्र आहे. रात्रीं तो फेंसाळतो. दिवसां उन्हांत वितळतो. तिथून बेबंद सुटलेल्या गरम सागरवाऱ्याचा मस्तवाल लोंढा आपली पहिली धडक ह्या मांडवात देतो. पडवींत पाय टाकतांच तो मान म्रोडीसी खालीं घालतो. माजघरांत त्याचें अस्तित्व जाणवतें, पण उग्रपण मावळतें. रुनयंपाकघरांत ते उग्र वारे चक्क शेपूट घालतात. आणि मागीलदारीं तर तें रांगणाऱ्या बाळासारखे लडिवाळ हंसतात

मैदानांत क्रांतीची भाषा करणारा डरकाळ्या फोडू पुढारी, स्वयंपाकघरांत तोंडचें अवाक्षरहि न काढतां मान खालीं घालून ताकभात होरपतो, तशी अवकळा हें मागीलदार सोसाट्याच्या तप्त सागरवाऱ्याला आणतें. उन्मत्त शक्तीला आळवाच्या पानांसारखा मऊपणा केवळ ही मागीलदार नामक टिचभर वास्तुच आणूं जाणें ! अगदीं लहानपणीं मला घरीं शिकवणीला मांस्तर ठेवले होते. त्यांचें नांव रंगूमामा !

पुढीलदारच्या प्रशस्त पडवींत बसून ते आम्हांला इंग्रजी शिकवीत. शिकवतां शिकवतां मान फिरवून पिकदाणींत पचापचा थुंकत आणि डाव्या हातानें आमचीं कानशिलें लालेलाल करून टाकत. त्यांचा आवाजहि इतका क्रूर भासायचा कीं, त्यांच्या दम भरण्यानेंच आम्ही अर्धी कच खायचे! उरलेल्या अर्ध्या हुरुपाचा बट्ट्याबोळ करायला दादोबा पांडुरंगाचें व्याकरण समर्थ होतेंच! पण तेच मास्तर मागीलदारीं भाजी नीट करत बसलेल्या आमच्या आईकडे चार आणे हातउसने मागायला जात, तेव्हां त्यांचा आवाज साळुंकीपेक्षा मंजुळ होई! पुढीलदारचा त्यांचा करडा रुबाब मागीलदारीं शिवरीच्या कापसासारखा मऊमऊ रूप धारण करायचा.

आमच्या मागीलदारचं परसुं आटोपशीर पण वेडंवाकडं आहे. तिथें थेट दारासमोरच मोगरीचा एक जुना जाड वेल होता. माझी कल्पना आहे कीं, तो किमानपक्षीं पन्नास-साठ वर्षांचा तरी जुनापुराणा असावा. कारण तो मनगटापेक्षांहि जाड होता. आम्ही पोरं त्याच्यावर ओळखांवे घ्यायचे तेव्हां तो गदगदा वर खालीं हालायचा. चैत्रांत त्या वेलीवर शुभ्रधवल धुपक्या फुलांचा बहर लगडायचा. पहांटेला त्याच्या खालीं टोपलीभर फुलांचा सडा पडायचा. त्याच्या सुगंधानें सारें आवार रात्रभर घमघमायचें. सगळ्या मुलींची त्या वेलफुलांवर टूक असे. आम्हांला आमच्या घराचा अभिमान ज्यामुळें वाटायचा, त्यांत पडवींतल्या झोंपाळ्या खालोखाल मोगरीच्या वेलीला स्थान होतें. असा बहुगुणी वेल तो. पण, कां तें आतां धड आठवत नाहीं, एके दिवशीं दुपारीं आम्ही तो वेल पाळामूळांपासून छाटून टाकला! अजगरासारखं अजस्र वेटोळें घेत बोरीच्या फांदीवरून आकाशाचा नराकार चेहरा गोंजारणारा तो चैतन्यशाली वेल बघतां बघतां पायतळींच्या मृण्मय मातींत निर्जीवपणें कोसळला. तेव्हांपासून मागीलदारचा मोगरीचा वास जो पळाला, तो कायमचाच. त्याच्या सहस्रावधी पुष्पदलांचे गजरे मनगटाला बांधून आम्ही जत्रेच्या रात्री जागवल्या होत्या; आमचा आनंद त्याच्या उन्मादक सुगंधानें द्विगुणित झाला होता, त्याप्रमाणेंच आमच्या दुःखाच्या वेळीं आपल्या ओल्या स्पर्शानें फक्त त्यानेंच आम्हांला दिलासाहि दिला. मॅट्रिकच्या परिक्षेंत नापास झाल्यावर विषण्ण मनानें मी जी मान टाकली ती त्या मोगरीच्या ओल्या कळ्यांच्या राशीवरच. खूप खूप स्पर्श अनुभवले; भोगले; उपभोगतहि आहे. पण गालावर मोगरीच्या सुगंधी रेशमी कळ्या टेकल्यावर स्पर्शाची जी गहिरी संवेदना जाणवते तिच्यांतला गोडवा आणि निरागसपणा दुसऱ्या कुठल्याहि स्पर्शांत नाहीं, हें ब्रह्मवाक्य.

रखुमाईच्या शेजारीं विठोबा शोभतो, त्याप्रमाणें त्या मोगरीच्या शेजारींच काळा राकट माड उभा ठाकला आहे. त्याच्या बाजूच्या केळीं उफाड्यानें वाढल्या. पुष्ट झाल्या. पण माड बुटका तो बुटकाच राहिला. गेल्या पंचवीस वर्षांत तो इंचभरहि वाढला नाहीं. असेल, त्याचें शैशव चालूं असेल! बेटा, जिते रहो! माडाच्या आंवतींभोंवतीं आंब्याचीं झाडं आहेत. माघांत त्यांना मोहोर फुलला, म्हणजे एरव्हीं गवतावरचे किडे टिपणाऱ्या साळुंक्या, आंब्याच्या सर्वांत वरच्या उहाळींवर बसून सकाळीं गाणीं म्हणतात. मोहोर फुलला, कीं बायका दिवसांतून छपन्न वेळां आंबा न्याहाळून उत्पन्नाचं गणित मांडतात, पुसतात, नि परत नव्यानें मांडतात; कैरीच्या लोणच्यासाठीं बरण्या रिकाम्या करून उन्हांत शेकवतात. आंब्यांना लागूनच शेवगा आहे. पौषांत तो पांढऱ्या शुभ्र फुलांनीं बहरून निघतो. त्याच्या पलीकडे पायवाट ओलांडून चिंचेचा डेरेदार वृक्ष आहे. त्याच्या पर्णराजींत कावळ्यांचीं घरटीं आहेत, डोलींत खारींची वीण आहे, आणि बुंध्यांत मुंगुसाचं बीळ आहे! ह्या सर्वांना आधार देणारा तो वृक्ष आम्हांला अमूप छाया देतो; पहिलटकरणींचे चिंचेचे डोहाळे मनसोक्त पुरवतो. त्या चिंचेपाशीं आमचें परसूं संपतें. कांटेरी सुपर्ण निवडुंगाची वेलबुट्टीदार वई आमची हद्द दाखवते. तिथून पलीकडे जीं भातांचीं खाचरं लागतात, तीं परक्यांचीं. आमच्या परसवांत आंब्याच्या बिटक्या चोखून साली परक्याच्या आवारांत भिरकवण्याचा उद्योग चैत्रांत आमच्या घरीं राजरोसपणें चालूं असतो!

कणकेश्वराच्या धुकाळू डोंगराआडून सूर्याची जीं पहिली कोंवळीं शेंदरी नारंगी किरणं पडतात ती ह्या मागीलदारच्या वास्तुलाच मंत्रून टाकतात. वईचा निवडुंग हें कांहीं देखणं झाड नाहीं. पण पौषांत त्याला कोंवळीं पानं फुटली कीं तो शोभायमान दिसतो. त्या निवडुंगाच्या अंगाखांद्यावर मग शेंदरी छटा फांकूं लागते. केळीची कोंवळीं पानसुद्धां कोंवळ्या सूर्यप्रकाशांत वासरांच्या त्वचेसारखी लुसलुशीत दिसतात. वाटतं, त्यांच्या अंगावरल्या कोंवळ्या मखमलीवरून हलकेंच हात फिरवावा आणि मऊ स्पर्शाची भूक भागवून

[ पृष्ठ ५२ वर पहा ]















अनु.—**श्रीकृष्ण ठाकूर**

**: १० :**

जी माणसं संकट आणि महत्त्वाकांक्षेच्या वेळीं एकत्र येतात—त्यांच्यामध्यें जो स्नेहाचा धागा निर्माण होतो त्यानं........

कमांडर जेम्स् कल्व्हर्ट यांच्या ह्या अनुवादित पण थोर साहस कथेचें अखेरचें हलवून सोडणारें प्रकरण—

**गुरुवार** तारीख एकोणीस रोजीं आम्ही नकाशामधें जेथले तपशील नोंदलेले नाहींत अशा पाण्यामध्यें होतों, आणि तें अंतर बर्फविहीन उघडया समुद्रापासून १२०० नॉटिकल मैल होतं. आणि इथं समुद्र पृष्ठावर यायला आम्हांला जागा मिळत नव्हती. आतां या क्षणीं जर का आमच्या जहाजाच्या यंत्र-सामुग्रींत कांहीं बिघाड झाला तर आम्ही काय बरं करूं शकूं ? स्केटच्या दोन्ही सफरींमध्यें आपण मागं परतावं असे विचार प्रथमच माझ्या मनांत आले. पण तरीहि आर्क्टिकमधील या निर्मनुष्य भागांत काय काय आहे, कसं कसं आहे याची नोंद घ्यावी यासाठीं आम्ही उत्सुक होतों. वॉल्ट विट-मन् आणि मी दोघांचाहि आत्मविश्वास ढेपाळूं लागला होता, तरीहि वर मोकळं बर्फ मिळण्याची शक्यता कितपत आहे याविषयीं चर्चा करीत होतों. इतक्यांत डेक ऑफिसरनं स्केट मागं घेतली तें आम्हांला कटाक्षानं जाणवलं. एका अंधुकपणें जाणव-लेल्या झरोक्याकडे परत एक वेळ पहावं हा त्याचा उद्देश असावा. मी लगेच कंट्रोल सेंटरकडे गेलो व झरोका कसा काय दिसतो याची चौकशी करूं लागलो.

'लहान आहे पण विचार करण्याजोगा आहे' विल काडहील विचारपूर्वक म्हणाला.

काहीं मिनिटांच्या आंतच पेरिस्कोप-मधून मला आमच्या काळचा तक्तपोशीवर हिरवट रंगाची फिक्कट रेषा दिसूं लागली. काळयाशार काळोखांत नाळेवरून सोडलेला फ्लडलाईट बर्फाच्या खालच्या बाजूला प्रकाशीत करीत होता. आणि आम्ही वर वर येत होतों. एकाएकीं उजेड दिसेनासा झाला आणि सारं काळंकुट्ट झालं. क्षणभर आम्ही भांबावून गेलों. नंतर काय झालं तें लक्षांत आलं आणि आम्ही विजयाचा आणि सुटकेचा निश्वास सोडला—तो फ्लड-लाइटचा उजेड वर हवेमध्यें पसरला होता. आम्ही बर्फ फोडून बाहेर आलों होतों. पण तें बर्फ इतकं पातळ होतं कीं तें फोडलं गेलं हें आम्हांला कळलंच नाहीं अद्यापपर्यंत आम्ही अनुभवलेल्या दृश्यांपेक्षां इथचं बाहे-रचं दृश्य सर्वस्वी निराळं होतं. चकाकणाऱ्या चांदणी आकाशांत एकहि ढग नव्हता. एका-दशीचा चंद्र खालच्या बर्फावर आपलं चांदणं पसरवीत होता आणि त्या चकाकत्या बर्फांत तें चांदणं कल्पनातीत चकाकत होतं. मनाला वेड लावणारं तें तेजस्वी चांदणं, ताऱ्यांनीं चकाकणारं आणि एकहि ढग नसलेलं विलोभनीय आकाश, या साऱ्यांच्या-मुळें एक आगळंच मंत्रमुग्ध करणारं सौंदर्य निर्माण झालं होतं. यावेळीं आमची परि-स्थिति सुरक्षिततेची होती, तेव्हां इथं काहीं वेळ थांबून मनावरचा ताण हलका करायचा

असं मी ठरविलं, तसंच हें अद्वितीय निसर्ग-सौंदर्य प्रत्येकाला पोटभर पघूं द्यायचं असंहि मी ठरविलं.

आमचं भोजन झालं आणि सूर्योदय व्हावयास सुरवात झाली. तें सूर्यबिंब इतकं स्वच्छ आणि स्पष्ट होतं कीं जणुं काय तांबड्या कागदाची चकतीच क्षितिजाकडून वर सरकते आहे असं वाटे. आमच्या सभोवार पसरलेल्या मैदानांमधून सूर्याचा उजेड चमचमूं लागला. डेव्ह् बॉइड् माझ्या बाजूला येऊन उभा राहिला, व मला विचारूं लागला 'इथं पाण्यांत बुड्या मारण्याचा प्रयत्न केला तर कसं?'

'डेव्ह, अरे इथलं उष्णतामान शून्याखालीं तेवीस अंश आहे, माहीत आहे ना?' मी म्हटलं.

तेव्हां तो हंसला व म्हणाला 'ज्या क्षणीं आपण पाण्याच्या पोटांत जाऊं तेव्हां आपणांस गरम पाणी लागेल नि बरं वाटेल.'

स्केटला बर्फ इतकं चिकटलं होतं कीं पोहणारांना पाण्यांत जाण्यासाठीं आम्हांला बर्फाला भोक पाडून जागा करावी लागली. डेव्ह् आणि इतर तिघे आपले जणु मंगळा-वरचे पोशाख चढवून तें काम करण्याच्या मागे लागले. नंतर आंगठा वर करून खुणा करून डेव्ह् पाण्यांत उतरला. क्षणभर तो त्या बर्फाच्या भोकाकडे थांबला व मग खालीं पाण्यांत गेला. त्याच्या सुरक्षिततेसाठीं त्याच्या कंबरेला दोरा बांधला होता व त्या दोऱ्याचं टोक बाहेर होतं. आणि हा बारीक दोर त्या भोकांतून आंत जातांना चमत्कारिक दिसत होतं. थोड्याच वेळांत तो त्या पाण्याखालून त्या बर्फाच्या भोकाकडे आला. मग त्यानं तोंडा-वरील श्वासोच्छ्वास घ्यावयाचं आवरण दूर केलं व म्हणाला "छान, फारच छान. हें पाणी उबदार आणि स्फटिकासारखं शुभ्र आहे. तरीसुद्धां डेव्हबरोबर आपण जावं असं मला काहीं वाटलं नाहीं!

दुसरे दोघेजण त्या भोकांतून पाण्या-खालीं गेले. त्यांचा हेतू पाण्याखालून बर्फाच्या कड्यांपर्यंत जायचा होता. त्यांना जाऊन दहाएक मिनिटं झालीं आणि माझा जीव कासावीस होऊं लागला. तोंच त्यांची डोकीं एकाच वेळीं पाण्यांतून वर आलेलीं मला दिसलीं.

त्यांच्याशीं बोलण्यासाठीं म्हणून मी खाली वाकलो. त्यांचे चेहरे फिकट आणि काळेनिळे झालेले दिसले. 'कोणी जिवंत प्राणी वगैरे आहे का?' मी विचारलं.

'फक्त जेली फीश. दुसरं काहीं नाहीं. तिथं उजेड बरा आहे. जणू काय काचेच्या तावदानाखालींच आपण पोहतो आहोत असं वाटतं.'

जेव्हां तीं माणसं डेकवर येऊन उभीं राहिलीं तेव्हां त्यांच्या स्पंजच्या कपड्यांत जिरलेलं पाणी लगेच गोठलं. आणि जहा-जाच्या आंतील गरम भागाकडे जातांना ते प्रत्येक पाऊल उचलीत तेव्हां किणकिण, कडकडा असा आवाज, काच चुरडली जात असताना जसा आवाज व्हावा तसा आवाज होऊं लागला.

तिथंच रहावसं वाटत होतं. तरी आम्ही पाण्याखालीं गेलों आणि पुढचा प्रवास सुरू केला. दुसऱ्या दिवशीं सकाळपर्यंत न्यू साय-बेरियन बेटांपासून आम्ही जवळजवळ शंभर मैलांवर गेलों. इथं आम्ही उजवीकडे वळलों आणि ध्रुवप्रदेशाच्या खोऱ्याची पाहणी पुढे चालवली.

तो दिवस शांत गेला. जो तो आपापले रिपोर्ट अद्यावत् करण्यांत गुंतला होता. रात्री नऊच्या सुमारास माझ्या दरवाजावर जोरांत टक्टक् झाली. डेव्ह् बॉयड् दरवाजा उघडून आंत डोकावला.

'कॅप्टन' तो म्हणाला 'इंजिन खोलींत भोक पडलं आहे. तुम्ही तें पहायला येतां का?

आम्ही लगेच इंजिन रूमकडे जावयास निघालों. वाटेंत डेव्ह् म्हणाला 'डाव्या अंगाचा सर्क पंप आहे ना, त्यामधें शॅफ्ट जिथं शिरते तिथल्या झाकणांतून पाणी येतंय्!'

स्केटच्या बॉयलरमधली वाफ इंजिन-रुममधें येते तेव्हां तिला फार दाब असतो. टरबाइनच्या पात्यामधून जाताना त्याचा हिस् असा आवाज होतो, व तीं पातीं अशी गती धारण करतात कीं ती दिसतच नाहींत. नंतर ती वाफ मोठ्या कंडेन्सरमध्यें जाते, व तिथें उष्णता कमी झाल्यामुळें त्या वाफेचं पाणी होतं व तें पाणी परत बॉयलरमधें जातं. सेंट्रिफ्यूगल पंप समुद्राचं पाणी वर नेऊन वाफ थंड करण्याचं काम करतो. इंजिन रूममधलीं माणसं त्याला 'सर्क' पंप म्हणतात.

आम्ही घाईघाईनं इंजिनरुमच्या खालच्या माळ्यावर उतरलों. फ्लशलाईटच्या उजेडांत मला आढळून आलं कीं तेथल्या नादुरुस्त झांकणांतून पाणी इतस्ततः फवारत होतं. पाणी स्टील डेक प्लेटस्वरून आमच्या खालच्या बाजूपर्यंत आलं. हवा जाण्या-येण्याचे पंप, इलेक्ट्रीकल स्वीच बोर्डचे दरवाजे, साऱ्यावर तें पाणी शिडकावत होतं.

'तें छिद्र बंद करायचा काहीं मार्ग नाहीं का?' मी विचारलं.

डेव्हनें आपलं डोकं नकारार्थी हलविलं. 'हें नव्या तऱ्हेचं सील आहे. तें झटकन् दुरुस्त करायला मार्गच नाहीं. वस्तुतः हीं सिलं नेहमीं ठाकठीक असतात. पण आतां मात्र प्रसंग साधा नाहीं.'

"मग दुसरं सील बसविण्यासाठीं कंडेन्सर बंद करावा लागेल ना?"

त्यानं मान हलविली. पण कंडेन्सर बंद करणं म्हणजे आमचीं निम्मी टर्बाइन्स बंद करणं आणि पाण्याखालीं सर्व टर्बाइन्स चालू नसतां पाणबुडी चालवणं हें तांत्रिक दृष्ट्या धोक्याचं होतं.

'मला वाटतं ही दुरुस्ती आपल्याला पाण्याच्या पृष्ठभागावर गेल्याशिवाय करतां येणार नाहीं.' मी म्हटलं.

आमचं संभाषण चालू असतां इंजिन-रुमचा प्रमुख चार्लस् व्हाइटहेड आमच्या बाजूला उभा होता. बॉइड् त्याच्या बाजूला वळला व त्यानें त्याचं मत विचारलं.

'हें मोठं आवघड काम आहे,' व्हाइटहेड म्हणाला 'आपणाला सर्क पंपची मोटर

क्षांखळदंड बांधून वर उचलायला हवी. मला वाटतं तिचं वजन जवळजवळ अर्धा टन असावं. काम चालू असतां मध्येंच अडथळा आला तर तें अतिशय धोक्याचं ठरेल.'

'तें सील होतं तसं आपोआप नीट बसण्याची एक शक्यता आहे. केव्हां केव्हां तसं होतं.' डेव्ह म्हणाला.

त्या प्रचंड इलेक्ट्रीक मोटरकडे मी पाहिलं. त्या मोटरच्या वाइंडिंगमधें पाणी सप्सप् करीत शिरावयास सुरुवात झाली होती. हें असंच आणखी कांहीं वेळ चाललं तर ती मोटर निरुपयोगी होईल आणि तिच्या ऐवजीं दुसरी मोटर तर आमच्याकडे नाहीं.

'त्या सील भोवतीं आपण कॅनव्हासचं झांकण घालूं या म्हणजे पाण्याचा फवारा उडणार नाहीं. आणि मग केव्हांतरी तें सील आपोआप घट्ट बसेल अशी आशा करूं या' डेव्ह म्हणाला.

'अगदीं बरोबर' मी म्हणालों 'आणि आपणाला पृष्ठभागावर येण्याचं जमलं कीं मग आपण ती दुरुस्ती करूं या.'

उरलेली रात्र आम्ही स्केट जास्त गतीनं हांकारली. मधून मधून आम्ही खोल पाण्यांत जात होतों व मग थोडे वर येत होतों. त्यावेळीं डॉ. लायन हे पाण्याची उष्णता मापीत होते. आमच्या ह्या वर-खालीं येण्यामध्यें केव्हांतरी सर्क पंपवरील दाबांत कमीजास्तपणा झाला व तें सील घट्ट बसलं. त्यांतून पाण्याचा एक थेंबहि येईना. मात्र डेव्ह अगर मी—आम्हां दोघांनाहि हा त्रास परत चालूं होणार नाहीं याची खात्री नव्हती.

ही चर्चा आम्ही करत होतों त्याच वेळीं स्केटला धक्का बसला. ऑफीसरनं तिला पातळ बर्फाकडे मागं नेली. इथं वर येण्याचा प्रयत्न करायला हरकत नव्हती. आम्ही तसा प्रयत्न केला व सहजपणें वर आलों. आमचं हें तळं अरुंद आणि खूप लांब गेलेलें होतं.

आतां काय करायचं ? पंप दुरुस्त करायचा कीं नाहीं ? आमच्या वेळापत्रकाप्रमाणें या बर्फमय प्रदेशांत आम्ही आणखी आठवडाभर रहाणार होतों. अद्याप आम्हांला हजारों मैल प्रवास करायचा होता. किती तरी अपुरी ठिकाणं पुरी करायची होती.

चर्चा करण्यासाठीं मी सर्व अधिकाऱ्यांना बोलावलं. शेवटीं मी म्हटलं 'आपण त्या सालीला एक संधी घेऊन बघूंया. हें आहे असंच व्यवस्थित चालेल असं मला वाटतं.'

रविवार—बावीस मार्च रोजीं सायंकाळीं सात वाजतां माझा टेलिफोन जोरजोरानें घणघणूं लागला. 'सर्क पंपचं सील परत एक वेळ सैल झालं आहे !' डेव्ह बॉइड् बोलत होता. 'यावेळीं परिस्थिती फारच वाईट आहे. यावेळीं पाणी चारी बाजूंनी फेंकलं जातंयू, आपणाला पाणबुडी वर घेऊन हें आतांच्या आतां दुरुस्त करायला हवंयू'.

मी तिथं जाऊन प्रत्यक्ष पहाण्याची कांहीं आवश्यकता नव्हती. डेव्हचा आवाजच परिस्थितीची गंभीरता सांगत होता. मी सरळ कंट्रोल सेंटरमध्यें गेलो. तिथं गाय शाफर बारकाईनं पहात होता. आतां काय करणं आवश्यक आहे तें मी त्याला सांगितलं.

'माथ्यावर बर्फाचा जाड थर आहे; आणि तो कित्येक तास तसाच आहे. मागें जाण्यात कांहीं अर्थ नाहीं !' गाय म्हणाला.

कंट्रोल सेंटरमध्यें गंभीर वातावरण निर्माण झालं. मी स्वतःशींच म्हणालो—काय मूर्ख मी ! त्या दिवशीं जेव्हां आम्ही पृष्ठभागावर आलो होतो तेव्हांच ही दुरुस्ती केली असती तर ! दोन तास निघून गेले. आम्ही बत्तीस मैल पुढें आलों तरी डोक्यावर मात्र जाड बर्फाचा थर. कुठेंहि मध्यें वर यायला किंचित्हि जागा नव्हती.

कसाबसा मी माझ्या खोलींत आलों. आइसमशीन आणि टेलव्हीजन यांच्याकडे मी नुसतं बघत राहिल्यानं कांहीं सुधारणा होणार नव्हती. तिथं तज्ञ माणसं होतीं व तीं आपापलीं कामं करीत होतीं. माझ्या तिथं उभं रहाण्यानं त्यांना उलट अस्वस्थ वाटत होतं.

आणि नंतर एक तासाच्या आंत जहाज एका अंगाला कलंडत झटकन् वळलं. त्या लोकांना काहीं तरी सुगावा लागला असावा. मी झटकन् कंट्रोल सेंटरमध्यें गेलों. तिथं गाय शफर बदली अल् केहन बसला होता.

'चांगलं मोठं आहे' लांबसर हास्य करीत अल् म्हणाला.

बर्फ शोधक यंत्राकडे मी पाहिलं. शेकडों यार्ड पातळ बर्फ—थराखालून आम्ही जात होतों हें निश्चित. टेलव्हीजनवर स्वच्छ उजेड दिसत होता. लौकरच आम्ही एका झरोक्याखालीं आलों, व तिथं पाणबुडी सावकाशीनं वर आणली. पेरिस्कोपमधून आमच्या परिचयाचा हिरवा रंग, त्याची बाह्यरेषा दिसत होती. त्या पलिकडे बर्फ थराचा काळा रंग होता. दहा वाजून तेरा मिनिटांनीं आम्ही त्या पातळ बर्फथराला धडक मारली. त्या धडकीनं आमचीं आंतडीं ढवळून निघालीं. पण टेलव्हीजनवर पाहिलं तों बर्फ फुटलं होतं—मार्ग मोकळा झाला होता.

मी ब्रिजवर चढून पाहिलं तों क्षितिजावर पुसट असा सूर्योदय दिस होता. आम्ही वर आलों ती उघडीक लांबलचक असून तिथल्या बर्फावर नितळ हीम पडलं होतं. अद्यापपर्यंत आम्ही फोडलेल्या कुठल्याहि बर्फापेक्षां हें बर्फ जास्त जाड होतं. आम्ही वर आलों आणि जहाजाला चारी बाजूंनीं बर्फ जलद येऊन भिडलं. डाव्या अंगाला बर्फखंड दहादहा बारा-बारा फूट उंचीचें होतें, आणि एकावर एक लाद्या ठेवल्याप्रमाणें तें दिसत होतं.

डेव्हनें लगेच मला विचारलं कीं पंप दुरुस्तीला सुरुवात करावी का ? 'कितीसा वेळ लागेल ?' मी त्यावर विचारलं. 'साधारणपणें बारा तास' तो म्हणाला.

त्या हिवाळीं सफरींत इतका वेळ आम्ही कुठेंच समुद्रपृष्ठावर राहिलों नव्हतों. जहाजाच्या डाव्या बाजूला असलेल्या बर्फाच्या कड्यांवर एक वेळ नजर टाकायचं मी ठरविलं.

त्या तुटलेल्या बर्फखंडाच्या कडा तीक्ष्ण धारदार होत्या. त्याचा अर्थ, त्या बर्फ-शीला नुसत्याच तुटलेल्या होत्या. त्या कडांची उंची पंधरा फूट होती व त्या उघडलेल्या कडेकडेनें शेकडों यार्ड दूरवर पसरली होती. उंचावर चढून मी पाहिलं. क्षितिजापर्यंत पसरलेलीं बर्फाची मैदानंच्या मैदानं. दुसरं काहीं नाहीं. मी फोटो घ्यायचे ठरविले





पण शून्यांखालीं एकतीस डिग्री उष्णतामानांत तें कसं काय जमणार? कोणत्याहि तऱ्हेचं संरक्षण नसतां आठवडेच्या आठवडे लोक इथं कसे काय रहातात? मला कांहींच कळेना. जो कोणी असे राहिले त्यांना माझा सलाम.

मी जेव्हां परत जहाजावर आलों तेव्हां इंजिनरुममधें माणसांची वर्दळ आणि हत्यारांचा आवाज ऐकूं येत होता. मोटरवरील लॉकर्स, वायर्स, वगैरे दूर करण्यांत कांहीं माणसं गर्क होती–त्यांचा प्रमुख होता व्हाईट हेड. दुसरीं माणसं ती मोटर वर उचलून टांगण्यासाठीं तारेची गोफण करीत होतीं. स्केट तयार होत असतांना ॲडमीरल रिकोव्हर यांच्या इंजिनिअर्सनीं कामाची कसूर केली नव्हती. या जहाजांतील कोणताही भाग समुद्रावर सफर करीत असतां काढून दुरुस्त करावा लागेल याची कल्पना करून त्याप्रमाणें काम केलें होतं.

प्रत्येक यांत्रिक भागाचा लाकडी नमुना तयार करून तो पाणबुडीमध्यें इकडून तिकडे नेतां येईल कीं नाहीं तसेंच प्रत्येक भागापर्यंत हात पोचतील कीं नाहीं याची चांचणी त्यांनीं आधीच घेऊन ठेवली होती. या सावधगिरीचा आम्हांला आतां उपयोग होत होता.

मी इथं राहिल्यानं या माणसांना कांहींहि उपयोग होणार नव्हता. मी पुढें माझ्या खोलींत गेलों. थोड्याच वेळानं माझा फोन घणघणूं लागला. 'कॅप्टन' अल् केहन काळजीच्या स्वरांत म्हणाला, 'आपण इथें याल तर बरं होईल.'

मी गरम कपडे घातले व ब्रीजवर गेलों. मी शिडीच्या अगदीं वरच्या टोकावर गेलों असेन नसेन तोंच दूर अंतरावर कसला तरी स्फोट व्हावा तसा कांहींतरी आवाज ऐकूं आला, 'अल् काय हें?' मी विचारलं.

शांतपणें त्यानें आपली दुर्बीण माझ्या हातांत दिली. 'बर्फ टेकडीच्या पलीकडं मैदानाकडे पहा.'

फार दूरवर बर्फाच्या मैदानामध्यें अतिशय शांतपणें बर्फाचे मोठमोठे हिरवे तुकडे एका टोकाकडून वर उडत होते व तशाच शांतपणें बाजूच्या शुभ्र बर्फात मिळून जात होते. हळुहळू ऐकूं येणारा आवाज मोठमोठा होत गेला. म्हणजे बाजूच्या बर्फानं चलनवलन करावयास सुरुवात केली होती.

मी माझ्या घड्याळाकडे पाहिलं. अकरा वाजून पंचवीस मिनिटं झालीं होतीं. इंजिनरुममध्यें कामास सुरुवात होऊन एक तास झाला होता. मात्र जहाजाच्या जवळ बर्फाची हालचाल दिसत नव्हती.

अगदीं जवळून कुठूनतरी बंदुकीच्या आवाजासारखा आवाज झाला. दचकून मी आजुबाजूला पाहिलं. पण कांहीं दिसलं नाहीं. नाळीकडे बोट करून केहननं मला दाखविलं. धोकादायक वाटावा असा तडा बर्फाला पुढच्या बाजूनं गेला होता. आमच्या जवळपासच्या बर्फाखालून क्षितिजापर्यंत प्रचंड शक्ति निश्चितपणें काम करीत असाव्यात व दहादहा फूट उंचीचे बर्फाचे चौक, लहान मुलांचीं खेळणीं तीं ज्या लीलेनें उडवतात, त्या लीलेने उडवीत असावेत. बर्फाच्या या चढउतारामुळें बर्फावर थोडीशी लाटांसारखी स्थिती झाली, व त्या लाटा स्केटच्या दिशेनं अटळपणें हालत होत्या.

जसजसा तो बर्फाच्या दळणाचा, चुरडण्याचा आवाज मोठा होऊं लागला तसतसं या तळ्यामधलं बर्फ वर चढूं लागलं. स्केटच्या धातूंच्या आवरणावर घुसतां घुसतां बर्फ भूतांच्या किंकाळ्यासारखा आवाज करीत होतं. हें जें मी माझ्या डोळ्यांनी पहात होतो त्यावर विश्वास ठेवणं माझं मलाच जड जात होतं. ह्या आर्क्टिकमध्यें पाण्याखालून पृष्ठभागावर यावयाची आमची ही पंधरावी वेळ, व पाण्याखालीं सुखासुखी व झटकन् जातां न येण्याची पहिलीच वेळ.

'बाहेर बर्फावर कुणी राहिला आहे का?' मी विचारलं.

'तुम्हांला बोलावण्यापूर्वीच मी सर्वांना आंत घेतलं?' अल् केहन म्हणाला.

आम्ही सर्वजण वर पाणबुडीवर होतों व ही धोकेबाज जागा सोडण्याच्या विचारांत होतों. बारा तास दुरुस्तीच्या कामापैकीं आमचं एक तास दुरुस्तीचं काम झालं होतं.

'वर येऊं का?' लेमन व विटमन विचारीत होते. मी हात हालवून होय म्हणून कळवलं. 'बाहेरच्या दबावामुळें जहाजाच्या आंत भयंकर कर्कश आवाज होत आहे. हें



सौभाग्यवती घरीं नाहींत, माहेरीं गेली आहे–

आहे तरी काय म्हणून बघायला मी आलों आहे'. विल् काळजीच्या सुरांत म्हणाला.

एव्हांना बर्फ दबावामुळें डेकवर चढलं होतं. स्केटच्या आवरणाचा बहुतेक भाग त्यानें व्यापून टाकला होता. विटमन् डावीकडील बर्फकड्यांकडे लक्षपूर्वक पहात होता. 'फार भयंकर दिसतंय् हें. आपण इथून निघून जाऊंया का ?' तो म्हणाला.

मी मान हलविली. 'वॉल्ट आतां एवढ्यांत नव्हे. बर्फाचं हें हलणं थांबेल असं तुला वाटतं का ?'

'या असल्या गोष्टीचं कांहीं सांगतां येत नाहीं. पण हें थांबेल असं कोणतचं चिन्ह मला दिसत नाहीं.' तो सावधपणानं बोलत होता.

आम्ही पृष्ठभागावर आलों होतों तेव्हां रेक्षां आमच्या डावीकडील बर्फाचा कडा दहा फूट पुढें आला होता. ती उघडीक बंद होण्याच्या मार्गावर होती. आणि जेव्हां ती पूर्ण मिटेल तेव्हां आमच्या स्केटची स्थिती अडकित्यांत सांपडलेल्या सुपारीसारखी होईल. चुरडणाऱ्या बर्फाचा आवाज आणि वहात्या बर्फाचा होणारा मोठा थोरला आवाज या दोहोंचा मिळून इतका प्रचंड आवाज होत होता कीं आम्हांला एकमेकांशीं बोलतांना मोठ्यानं ओरडावं लागत होतं. मी विल्ला खालीं जाऊन पंप दुरुस्तीचं कुठपर्यंत आलं तें पाहून यावयास सांगितलं. बर्फ आतां डेकवर दोन्ही बाजूंनीं चढत होतं व स्केटच्या लांबीच्या बाजूनं त्याला तंबूचा आकार आला होता.

जहाजाच्या मागच्या बाजूच्या कड्याकडून बर्फाची एक प्रचंड शिळा कडेनं सावकाश वर आली व जणू काय जहाजावर आपटते असं वाटूं लागलं. जहाजापासून अवघ्या तीस यार्ड अंतरावर होती ती. संमिश्र आवाज क्षणाक्षणाला वाढत होते. कांहीं आवाज आजारी स्त्रीच्या कण्हण्यासारखे वाटत होते तर काहीं रात्रीच्या वेळीं होणाऱ्या आगगाडीच्या शिटीसारखे पण खालच्या आवाज़ांतले वाटत होते.

११-३५ ला विल् लेमन माघारीं आला व म्हणाला कीं इंजिनरुममधील माणसांनीं ती प्रचंड मोटर उचलण्याची सर्व तयारी केली आहे. प्रत्येक भाग वेगवेगळा केला होता. 'कॅप्टन जहाजाच्या आंत ऐकूं येणारा आवाज चमत्कारिक आहे. मला वाटतं तुम्ही स्वतः तिथं जाऊन तो ऐकावा'. विल् लेमन मला म्हणाला.

माझं तोंड कोरडं पडलं. शिडीवरून खालीं कंट्रोल सेंटरमधें गेलो. तिथं जातांच माझ्या लक्षांत आलं कीं, जहाजाच्या पातळ पत्र्यावर बर्फाच्या घर्षणानें होणारा आवाज आंतल्या बाजूनें फारच मोठ्यानें ऐकूं येत होता. जणुं काय एखाद्या पिंपात आम्ही बसलों आहोंत, व तें पिंप खडकाळ रस्त्यावरून ओढलं जात आहे. आणि त्या आवाजापेक्षांहि स्केटची थर थर जास्त अस्वस्थ करणारी होती. पाणबुडीच्या सभोवारून बर्फ जात होतं तसे तिला धक्के बसत होते, तें डुचमळत होतं. जणुं काय असंख्य वेदना होत असतां ती त्या विरुद्ध निषेध नोंदवित होती.



आफ्त

तुझ्या
ओठांच्या गोदामांत
साखरेचा सांठा आहे
असं
आपण नाहीं म्हणणार !
न जाणो—
कुणी 'चेकिंगला' यायचे!

—सदाशिव करंदीकर

एक धक्का बसला. आणि जहाजाची उजवी बाजू कलली. आतां वाट पहाण्यांत अर्थ नव्हता. आम्हांला आतां खालीं जायलाच हवे होते. मला आतां चिंता उत्पन्न झाली होती. जहाजाच्या बाजूचं हें बर्फ इतकं चिकटलं होतं कीं स्केट आतां पाण्यांत कशी काय जाते ! मी धांवत इंजिनरुमकडे गेलो व डेव्ह् बॉयड्ला खूण केली व म्हटलं, 'आपणाला आतां खालीं जायचं आहे. जितक्या लौकर होईल तितक्या लौकर तुमची आवराआवर करा आणि तुमची तयारी झाली कीं मला सांगा.'

डेव्हनें मान हलविली व जें सोडवलं होतं तें जोडायला आपल्या माणसांना सांगितलं. मी मागें पुलाकडे जाण्यासाठीं निघालो. मी कंट्रोल सेंटरमधें येतांच आवाज कमी झाला, आणि जेव्हां मी पुलावर गेलो तेव्हां सर्वस्वी बंद झाला होता.

'आतांच एकाएकी आवाज थांबला आहे'. अल् केहन म्हणाला.

आमची स्केट ज्यांत उभी होती ती उघडीक आतां निम्मेहि राहिली नव्हती. आणि पिसाटासारखं बर्फ प्रत्येक दिशेनं पुढें धांवत होतं.

दुर्बिणींतून बाहेर पहात विटमन् म्हणाला, 'आतां क्षणार्धांत परत तें चालूं होईल. तिथलं बर्फ अद्यापहि हालचाल करीत आहे,' आणि कांहीं मिनिटांच्या आंत कुणीतरी भीतिदायक वाद्य वाजवावं तसं मर्त्यगीत मघापेक्षांहि उच्च रवानं ऐकूं येऊं लागलं. त्या पाणबुडीची थर थर इथल्या पुलावरच्या लोखंडी पट्टयांमधूनहि जाणवत होती.

बर्फामध्यें अडकलेल्या जहाजांच्या सर्व वाचलेल्या आणि ऐकलेल्या कथा माझ्या मनःचक्षूसमोरून सरकून गेल्या. याच पाण्यांतली 'जेनेट', रँगेल बेटाजवळ हरवलेली स्टिफन्सनची 'कार्लक', अंटार्क्टिकमधें हरवलेली अर्नेस्ट शॅकल्टनची 'एंड्यूरस'.... आणि आतां बर्फाचं जे तांडव नृत्य पहात होतों, तशाच बर्फमय स्थितींत त्या जहाजांना समाधी मिळाली होती. आम्ही सध्यां दोन बर्फ प्रवाहांच्या मध्यें होतों. जेव्हां ते प्रचंड प्रवाह एक होतील तेव्हांच बर्फाचं खरं चुरडणं अनुभवास येईल. पण तिथपर्यंत थांबायला माझी छाती नव्हती. जेनेट, कार्लक व एंड्यूरसनवरील माणसांबरोबर कुत्रे व कुत्र्यांनीं ओढावयाच्या गाड्या होत्या. संकट समयीं जहाज बर्फांत सोडून या साधनांच्या योगें त्यांनी बर्फावरून प्रवास करून सुटका करणं शक्य होतं. पण आमच्या जहाजावर तसली कांहीं सोय नाहीं. आमचं जें काहीं आहे तें सर्व स्केटवरतीच.

थोडया वेळांत डेव्ह् आला आणि म्हणाला कीं, जहाज खालीं नेण्याच्या दृष्टीनें इंजिनरुमची तयारी आहे. आमच्या इंजिनिअरिंग खात्यांतील अर्ध्या यंत्रांचाच आतां उपयोग. अशा स्थितींतच बर्फांतून पाण्याखालीं जाऊन आम्हांला प्रवास केला पाहिजे. अल् केह्नशिवाय सारेजण खालीं गेले. जहाज खालीं नेण्याच्या दृष्टीनें सर्व तपासून लगेच त्यानें खालीं यावं म्हणून मी ओरडलों.

शिडीच्या तळाशीं गंभीर लांबट चेहरे केलेल्या माणसांनीं माझं स्वागत केलं. मी पेरिस्कोप स्टँडकडे जाऊन दरवाजे बंद करून अल् केव्हां येतो याची वाट पहात होतो. पण त्याला एवढा उशीर कां होतोय् ?

'कॅप्टन फोन घ्या'. ब्रीजकडून फोन आला होता. मी झटकन् फोन घेतला च चिडून म्हटलं 'इतका उशीर कां? आपण जाऊं या!'

'इथं कसलाच आवाज येत नाहीं. बर्फाच्या हालचालीची कसली खूण नाहीं. आपण प्रत्यक्ष इथं येऊन पहाल तर बरं!' अल् म्हणाला.

धोक्यांत असलेल्या जहाजाचा कप्तान जर द्विधा मनःस्थितींत असेल तर याच्या-सारखी वाईट गोष्ट कोणतीच नाहीं. कोण-ताच निर्णय न घेण्यापेक्षां चुकीचा निर्णय घेऊन त्याला चिकटून रहाणं चांगलं, कसंहि असो, मी पुलावर गेलों.

भयानक अशी संपूर्ण शांतता होती. कसलाच आवाज ऐकूं येत नव्हता. ही क्षणिक शांतता होती का? मी माझ्या घड्याळाकडे पाहिलं. अकरा पंचावन्न झाले होते. मघांचं तें बर्फाचं तांडव अनंत काळापूर्वी सुरू झालं होतं असं वाटलं पण तें अर्ध्या तासाहून थोडा जास्त वेळ इतकंच टिकलं.

मी थांबायचं ठरविलं. खालीं माझीं शंभर माणसं उत्सुकतेनें माझ्या निर्णयाची वाट पहात होती. दहा मिनिटं निघून गेलीं. मी विट्मन्ला वर ब्रीजवर बोलावलं. त्यानें बर्फाकडे काळजीपूर्वक पाहिलं पण तो काहीं बोलला नाहीं. आम्ही तिघेहि जण उत्सुकतेनें दूरपर्यंत बर्फाच्या मैदानाकडे पाहिलं; तिथं काहीं हालचाल दिसते का हें पहात होतों. पण नाहीं.

बारा वीसला एकाएकीं जवळच चुरड-ल्यासारखा आवाज झाला, आणि माझी खात्री झाली कीं मघांचंच संकट सुरू होतंय्. मात्र आतां दाब उलट कमी होत होता. जहाजाच्या बाजूला कांहीं इंच पाणी दिसत होतं. आम्ही तरंगत होतों.

आतां काय करायचं? थांबणं ही एक गोष्ट. पण इंजिनरुममधें कामाला सुरुवात करायची आणि थोडया वेळानें त्याला परत अडथळा यायचा. मी कांहीं मिनिटं स्वतःशींच शांतपणें विचार केला व मग डेव्हला ब्रीजवर बोलावलं.

जेव्हां तो आला तेव्हां पंप दुरुस्तीचं काम चालू करावयास त्याला सांगितलं, 'ठीक आहे सर' एवढंच तो म्हणाला व निघून गेला. माझ्या माणासांची माझ्या-वरची ही निष्ठा, हा विश्वास, खात्री रात्रभर झालेल्या मनस्तापापेक्षां किंवा इतर कशापेक्षांहि याचं मूल्य जास्त आहे.

पुलावर उभं राहून बर्फाची हालचाल पहायची असं मी ठरविलं–जणू काय माझ्या अस्तित्वामुळें तें बर्फ हालायचं थांबणार होतं. तासचे तास निघून गेले. पण बर्फ पुढें सरकेना. तेव्हां आंधळ्या श्रद्धेपेक्षां तर्कशास्त्र जास्त किमतीचं हें पटलं आणि मी काय मूर्खपणा करणार होतों हें लक्षांत आलं. उद्यां सकाळीं मी ताजातवाना असावयास हवा, कारण तेव्हां माझे पुष्क-ळसे अधिकारी झोपेनें पेंगुळलेले असतील.

मी खालीं माझ्या खोलींत जाऊन बिछान्यावर आडवा झालों. दिवा विझवण्या

पूर्वीच मी झोपी गेलो.

सकाळीं डेव्हनें माझ्या दारावर टक्‌टक् केलं तेव्हां साडे सहा वाजले होते. त्याचे डोळे तांबडेलाल होते व चेहरा सुकलेला दिसत होता.

'दुरुस्ती संपली, पाण्याखालीं जावयास केव्हांहि तयार,' तो म्हणाला.

सात तासांपेक्षां कमी वेळांत त्यानीं काम संपवलं होतं.

* * *

हे अविनाशी परमेश्वरा, स्वर्ग तूंच घडविलास आणि समुद्रावर तूंच सत्ता गाजवूं शकतोस. आमच्या देशाचं नौदल आणि त्यांत काम करणारी सर्व माणसं यांना तुझ्या समर्थ संरक्षणाखालीं घे. समुद्रावरील धोक्यापासून त्यांचं रक्षण कर .......

स्केटच्या भोजनगृहांत सायंप्रार्थनेसाठीं छोटासा समुदाय जमला होता. हालत्या बर्फाच्या आमच्या अनुभवानंतर बरोबर एक आठवड्यानंतरचा दिवस—रविवार एकोणतीस मार्चचा तो दिवस. त्या आठवड्यांत आम्ही चार वेळां समुद्रपृष्टावर आलों आणि पोलर समुद्राच्या पूर्वेकडील अर्ध्या भागांतून भरपूर प्रवास केला.

शुक्रवार तारीख सत्तावीस रोजीं आम्ही प्रिन्स कार्लस् फोरलंडकडून निघालों, व न्यू लंडनच्या रोखानें चाललों. आम्ही नौदल खात्याला आमच्या कामाचा थोडक्यांत अहवाल पाठवला. त्यांना तो नक्की मिळाला. कारण जेव्हां जेव्हां आम्ही पेरिस्कोप पाण्यावर येण्याइतक्या उंचीवर येत असूं तेव्हां तेव्हां बातमीच्या सदरांत स्केटची बातमी ऐकावयास मिळे.

अभिनंदनपर संदेश यावयास सुरुवात झाली. नेव्हल ऑपरेशनच्या प्रमुखाकडून आलेला छोटासा संदेश, त्यांत एवढं म्हटलं होतं—

**'शाबास × आर्ले बर्क'**

आणि खरोखरीच आम्ही आमचं काम चोख केलं, अशी आमची भावना होती. आम्ही निघतांना आमच्या ज्या गोड कल्पना होत्या त्यापेक्षांहि जास्तरित्या आम्ही यशस्वी झालों होतों. 'जगाचें भवितव्य घडविणारा समुद्र' असं ज्याला म्हणतां येईल त्या समुद्राच्या पोटांतील आम्ही आद्य प्रवासी ठरलों होतों.

अतिशय दुःखद् अंतःकरणानें आम्ही आर्क्टिकचा निरोप घेतला. बर्फाच्छादित समुद्रपृष्ठाच्या बाहेर जेव्हां आम्ही प्रथम आलों तेव्हां एक मोठें साहस संपलं होतं. गेली दोन वर्ष आम्ही सर्वजण जे अपरिमीत श्रम केले होते त्याची सांगता झाली होती. आतां आम्ही माघारी घरीं चाललों होतों. माझे सहकारी आपापल्या निराळ्या मार्गानें जाण्यासाठीं विभक्त होतील. नुसती नौदलाची माणसं नव्हे तर मुलकी माणसं. हे सारे अगदी खऱ्या अर्थानें माझे सहकारी होते.

गेल्या वर्षात त्यांनीं अज्ञाताशीं सामना दिला व त्याला ज्ञात केला. गोठलेल्या बर्फानें सदा आच्छादिलेल्या काळाशार समुद्र हें त्यांचं मूलतत्त्व. ते त्याच्या रौद्र सौंदर्यावर प्रेम करावयास शिकले होते.

यंत्र आणि हत्यारं हीं त्याचीं शास्त्र आणि संरक्षक अस्त्रं. पण जो जय मिळविला तो काहीं यंत्रानीं नाहीं. तो माणसानीं मिळविला. अज्ञाताच्या आव्हानाचा स्वीकार करतांना माझ्या सहकाऱ्यांवर मी टाकलेला विश्वास त्यांनी तर पुरा केलाच पण कित्येक वेळां त्याहिपेक्षां जास्ती काम त्यांनीं केलें. हें पहाणं—अनुभव अभूतपूर्व होता. त्यांच्या विनयानें मला उत्साहित केलं कारण मला नेहमींच खात्री होती कीं, जीं माणसं नौदलांत काम करतात तीं राष्ट्राचीं प्रतीक असतात आणि त्यांच्या विजयानें, ज्या राष्ट्रानं त्यांना जन्म दिला त्या राष्ट्रावरील माझा विश्वास आणि त्या राष्ट्राविषयींचा माझा अभिमान वृद्धिंगत झाला.

जीं माणसं संकट आणि महत्वाकांक्षेच्या वेळी एकत्र येतात त्यांच्यामध्यें जो स्नेहाचा धागा निर्माण होतो त्यानं आम्ही कायमचे एकत्र बांधले गेलों होतों. आमच्या भावनांचं प्रतिबिंब त्या दित्रशींच्या प्रार्थ-नेच्या शेवटच्या ओळींत पडलं होतं—

परमेश्वरा, तुझ्या वचनाप्रमाणें तुझ्या या दासाला शांतपणें निरोप घेऊं दे. कारण त्यानें आपल्या डोळ्यांनीं तुझ्या कृपामयतेचं दर्शन घेतलं आहे. ●●●

भरपूर कॅल्शीयम युक्त

# बिटको ग्राइप

नेहमीं दिल्यानें
लहान मुलें सशक्त, बांधेसूद
व गुटगुटीत होतात.

BYTCO-GRIPE
बिटको-ग्राईप
BYTCO CHEMICAL

# बिटको

## काळी टूथ पावडर

नेहमीं वापरल्यानें
दांत मोत्यासारखे स्वच्छ
व चकचकीत होतात

Bytco
BLACK
TOOTH POWDER
CLEANS THE TEETH PEARL WHITE
BYTCO CHEMICAL INDUSTRIES

बिटको केमिकल इन्डस्ट्रीज, नासिक-रोड.



अनुक्रमणिका








**सायकलवरून** तो परत येत होता, त्यावेळीं त्याचें कुठेंच लक्ष नव्हतें. आपल्याला काय वाटतें आहे, हें त्याचें त्यालाच कळत नव्हतें. डोळे रस्त्यावर होते. पाय पॅडल् मारत होते. मान खाली होती. पण ते अवयव आपलेच आहेत, याचें त्याला भान नव्हतें. सायकल-प्रमाणें तेहि शरीरापासून सुटे आहेत. त्यांच्या-वरचा आपला तावा कोणत्याहि क्षणीं सुटेल आणि समोरून येणाऱ्या एखाद्या मोटारीखालीं आपलेंहि अस्तित्व संपेल, असें त्याला राहून राहून वाटत होतें. आपण कॅंपच्याच दिशेनें चाललों आहोंत याचीहि त्याला खात्री नव्हती. जणुं कांहीं तो रस्ता, ती सायकल, व ते पाय त्याला कुठें तरी नेत होते व त्याची लुळी पडलेली इच्छाशक्ति त्या गोष्टीला विरोध करीत नव्हती, एवढेंच.

बरॅक्पाशीं तो सायकल्वरनं उतरला, तेव्हां बरॅक्मध्यें बराच दंगा चालला होता. कुणीं ग.त होता, कुणीं ओरडत होता. खोल विहिरींतून अस्पष्ट पडसाद यावेत, तसं त्याच्या मनांतून त्या आवाजांचा क्षीण पड-साद येत होता. त्यानें पायरीवर पाऊल टाकलें, पण दुसरा पाय उचलून पायरी चढणें त्याला कठीण वाटूं लागलें. एखाद्या मोठ्या आजारांतून उठलेल्या माणसाप्रमाणें गुडघ्यावर हात टेकून तो त्या पायऱ्या कशाबशा चढला. मग दाराच्या चौकटीचा आधार घेऊन उंबऱ्यावरच थांबला—झोपेंतून अर्धवट जागें झाल्यावर जसें कांहीं समजेनासं होतं तसं होऊन.

एवढ्यांत आंतून दोघे तिथे बाहेर आले. मोठमोठ्या आवाजांत ते गप्पा मारत होते. तो तसा उभा दिसतांच त्यांच्यापैकी एकानें विचारलें,

"Where had you been?"

"Hospital."

जड जीभ उचलण्याचा प्रयत्न करीत तो म्हणाला.

"To see No. 182? How's he?"

"Dead"

कांहीं न समजल्यासारखा त्यांचा चेहरा क्षणभर कोरा राहिला. मग एकदम आश्च-र्यानें त्यांचे चेहरे लांबले, आणि त्याच्या दंडाला धरून त्यांतल्या एकानें विचारलें,

"Really? When ?"

"Just now. About fifteen min-nutes back."

एवढें कसेंबसें बोलून तो आंत शिरला. आपण पडूं कीं काय, व्हरांड्याच्या भिंतीवर आपटूं कीं काय, अशी त्याला भीति वाटत होती. घडपडत तो कॉट्जवळ पोचला आणि रिकाम्या पोत्याप्रमाणें बिछान्यावर कोसळला. कांहीं वेळ उशींत डोकं खुपसून तो तसाच पडून राहिला. त्याच्या डोळ्यांपुढील अंधा-रांत अनेक रंग, अनेक आकृत्या यांनीं खच-





—प्रभाकर नारायण परांजपे

त्यांनीं मृताच्या आत्म्यास शांति मिळावी म्हणून प्रार्थना केली होती. त्याच्या पत्नीसाठी ते पैसाही गोळा करतील. चर्चा होतील, शोकसभा होईल, आठवणी निघतील, पण........

लेल्या रांगोळ्या निर्माण होत होत्या आणि पुसल्या जात होत्या. आणि पुन्हां निर्माण होत होत्या.

त्यानें ज्यांना ती बातमी सांगितली होती, त्यांना एक प्रकारचा आनंद झाल्या-सारखें त्यांच्या आवाजावरून वाटत होतें. सर्वांत प्रथम आपल्याला ती बातमी कळली, सगळ्यांना ती आपणच सांगितली पाहिजे, अशा महत्वपूर्ण जाणिवेनें सगळ्या बरॅक्मध्यें ते ती जाहीर करीत होते. त्यांचा तो आवाज ऐकतांच त्याला पंडितजींच्या मृत्यूची बातमी सगळ्या बरॅक्समध्यें जाऊन सांगतांनाचा त्याचा आवाज आठवला. दोन्हींत किती साम्य होतें! रेडिओवरची बातमी ऐकतांच त्याला एकच वाटलें होतें—सगळ्यांना ही बातमी सांगितली पाहिजे, आणि तीहि आपणच. कारण त्यावेळीं रेडिओपाशीं तो एकटाच होता. ताडकन् तो धांवत सुटला होता. थर-थर कांपत प्रत्येकाला गदागदा हलवून जागे करीत होता व प्रत्येकाला सांगत होता,

"Get up. Nehru expired. Come to the radio."

आणि झोपेंतून उठलेल्या एकानें त्याला विचारलें होतें,

"Which Nehru?"

पण तसें कांहीं आतां होत नव्हतें. उशींत डोकें बुडालेलें असलें तरी सगळ्यांच्या आवाजावरून त्याला जाणवत होतें, कीं बातमी कुणालाच अनपेक्षित वाटत नव्हती. जो तो स्वतःला असलेली माहिती इतरांना पुरवित होता. सगळ्या बरॅक्मध्यें तेच तेच शब्द सिगरेट्च्या धुक्याप्रमाणें कोंदले होते. त्याला ते ऐकावेसे वाटत होतेहि आणि नव्हं-तेहि. त्यानें कोणत्याच दिशेनें प्रयत्न केला नाहीं. तरी कांहीं शब्द त्याच्या कानांत घुसत होतेच.

"अरे, the temperature had again gone upto 108 degrees."

"He was just 22."

"Married?"

"Ya! One year only and his wife was expecting....."

"What?"

"अरे, She is carrying – about six months."

तेवढ्यांत त्याच्या खांद्यावर कुणीतरी थोपटल्यासारखें केलें. आणि कुणी तरी म्हणाले,

"साव, ऐसा मत करना! ये अपनी हायकी बातें नहीं! आखिर तो उसकीहि इच्छा....."

मिशावाल्या उस्तादजीचा आवाज त्यानें ओळखला आणि त्याला क्षणभर गंमत वाटली. सीतारामनें सिक्रिपोर्ट करतांच हाच मुछाड त्याला वाटेल तसं टाकून बोलला होता. 'साब, सिक्रिपोर्ट करके आप गवर्मेंटको फँसाते हैं!' असं म्हणाला होता. आणि आतां सीताराम वारल्यावर..........

"थोडा पानी लाना! साव पानी पीओगे थोडा, तो ठीक होगा!"

असें म्हणत मुछाडनें त्याची मान वळवली. समोरच्या दिव्याच्या झणझणीत प्रकाशामुळें इतका वेळ बंद असलेल्या त्याच्या डोळ्यांना अंधारी आल्यासारखे झालें. पापण्यांची उघड-झांप करीत नजर स्थिर करण्याचा प्रयत्न केला तरी त्याला कांहीं वेळ कांहींच नीटसें दिसत नव्हतें. फक्त आपल्या भोंवती बरीच गर्दी जमली आहे, एवढेंच त्याला जाण-वलें. त्याला तें कांहींसें चमत्कारिक वाटलें. हॉस्पिट्लमध्यें कॉट्भोंवती जमून सीता-रामच्या शवाकडे पाहाणारे सगळेजण त्याला क्षणभर आठवले. त्यासरशी तो खाडकन्, उठून बसला आणि सगळ्यांना जाण्याची खूण करीत ओरडला,

"I am all right. You go. Go. I am all right."

पण त्याच्या नजरेंत अजूनही कुणी नीट बसलें नव्हतें. समोर धुरकट, सारवल्यासारखें दिसत होतें. उशींत बराच वेळ डोकें खुप-सून पडल्यामुळें असेल, पण त्याचें डोकें जड झालें होतें, डोळे बारीक व खोल वाटत होते. कुणीतरी विचारीत होते,

"What happened to him?"

"No. He is weeping. He was the closest friend of No. 182. Both came from the same part. Naturally...."

त्याला एकाएकी जाणवलें कीं त्याला मुळींच रडूं येत नव्हतें. टिपूसही नाहीं. फक्त वधीर झाल्यासारखें वाटत होतें. पण तसें त्याला गेले चार पांच दिवस झालें होतें. पंडितजी गेल्या-वर रेडिओवर रामधून व गीतेंतील श्लोक ऐकतां ऐकतां तो रडला होता. त्यांच्या महायात्रेचें वृत्त वाचतांनाहि त्याला हुंदके आवरतां आले नव्हते. कुटुंबप्रमुख एकाएकीं वारल्यावर असुरक्षिततेची, अनिश्चिततेची लाट यावी, प्रचंड जबाबदारीचा भार जाण-वावा तसें झालें होतें. पण मग मात्र त्याचें मन रिकामें झालें होतें. अगदीं कोरें. पुन्हां पुन्हां तो स्वतःलाच प्रश्न विचारीत होता.

"याचा अर्थ काय? पंडितजींनी इतकी धडपड केली त्याचें काय? आपल्या जगण्याचा अर्थ काय?!"

आणि एखाद्या प्रचंड काळोख्या गुहेच्या तोंडावरील शिळेपाशीं येऊन रस्ता संपावा, तसें झालें होतें. पण त्याला आतां ते प्रश्नहि अर्थशून्य, मूर्खपणाचे वाटूं लागले. त्याच्या मनांत आलें, कशालाच कांहीं अर्थ नाहीं. आतां पंडितजी आणि सीताराम यांच्यांत काय फरक राहिला? दोघेहि मेले. माणूस मरतो म्हणजे तरी काय होतें?

आतां तो बोलूं लागला होता. सीता-रामची माहिती सगळ्यांना सांगत होता. पण अजूनहि आपल्या शरीराशीं त्याला संबंध स्थापन करतां आला नव्हता. बोलणारें तोंड आपलेंच आहे, याची त्याला खात्री नव्हती. आपलें सगळें अस्तित्व डोक्यांतल्या कुठ-ल्यातरी सूक्ष्म गाठींत एकत्र झालें आहे, फक्त तिथेंच शिल्लक आहे, असें त्याला राहून राहून वाटत होतें. बोलणारे ओठ, दांत, जीभ आपल्या डोळ्यांनीं पाहिली, तर कदाचित् त्यांच्याशीं आपल्याला संबंध जोडतां येईल, असें वाटून त्यानें तिकडे पाहिलेंन्, पण मधें नाक येत होतें. शेवटीं त्यानें आपली जीभ चावली व ती कळ मस्तकांत पोंचतांच त्याला क्षणभर बरें वाटलें.

हळूं हळूं त्याचें मन हालचाल करूं लागलें. इतका वेळ तो एखाद्या निर्जीव बाहुल्या-प्रमाणें बोलत होता. पण आतां इतरांच्या बोलण्याच्या, प्रश्नांच्या, चेहऱ्यांच्या प्रति-क्रिया त्याच्या मनांत उमटूं लागल्या. पण त्या प्रतिक्रिया नेहमींसारख्या आकारहीन वा बुळबुळीत नव्हत्या. त्या धारदार होत्या. विलक्षण तीक्ष्ण होत्या. सगळे कॅडेट्स्, तो









कॅंप, तें ट्रेनिंग–सगळ्या सगळ्या गोष्टी त्याला क्षुद्र, संकुचित आणि आंवळ्या वाटूं लागल्या. स्वत:सकट सर्व गोष्टींबद्दल त्याला भयंकर घृणा वाटूं लागली.

मग तो इतरांच्या बरोबर बरॅक्बाहेर ओढला गेला. त्याला कळेना कीं सगळेजण 'बाहर चलिए', 'come out' कां म्हणताहेत. पण बाहेर येतांच एका ठिकाणीं जमलेला घोळका दिसतांच त्याला भयंकर संताप आला. दुखवटयाची सभा! गेल्या बुधवारीं सायंकाळीं झालेली सभा त्याला आठवली. तें दोन मिनिटें स्तब्ध उभें राहणें! पण त्याला बाजूला राहतां येईना. कुणी त्याला एकटयाला सोडायला तयार नव्हतें. जणुं तोहि सीतारामच्या प्रेताप्रमाणें किंवा सर्कशींतल्या जनावराप्रमाणें एक प्रेक्षणीय वस्तु होता. घोळक्यांत थोडीशी रेटारेटी चालली होती. असल्या प्रसंगीं सुद्धां कॅप्टन्च्या नजरेंत भरण्यासाठीं चाललेली घडपड पाहातांच त्याला शेणांतल्या किड्यांची आठवण झाली. किडे–वळवळणारे–कॅप्टन्चें भाषण सुरूच होतें:

"The doctors lost all hope by nine hundred hours in the morning. No. One eight two was unconscious since yesterday. He fought like a Man....."

त्याच्या मनांत आलें, ही फॉट् काय! तो कालपासून बेशुद्ध होता. आणि हे म्हणतात, ही फॉट्! खोटं बोलण्याला कांहीं सुमार "......but God's will prevails. Let us pray for the peace of his soul."

तो स्वत:शींच म्हणाला, परमेश्वरावर विश्वास असलेली माणसें आहेत तर अजून या जगांत! आणि मृतात्म्याच्या शांतिकरतां कसली आली आहे प्रार्थना? तो मेला, तेव्हांच त्याला चिरशांति मिळाली. आतां प्रार्थना केली पाहिजे, ती अजूनहि जिवंत असणाऱ्यांच्या शांतीकरतां. पण ती कांहीं मरेपर्यंत त्यांना मिळायची नाहीं—Let us pray for their souls आणि आत्मा आहे, हें तरी कशावरून?— of the living. मेलेला गेला, शेवटचें जळून थंड झाला — Let us pray... कॅप्टन्चा हॉस्पिटल्मधला चेहरा त्याला आठवला— कंटाळलेला, झोंपाळलेला, ढेपाळलेला. पण आतां बाहेरच्या काळोखांत तो अगदीं गंभीर व दु:खी वाटत होता—-- भूमिकेंतल्या त्या बदलानें तो आश्चर्यचकित झाला. आपलाहि चेहरा थोडा दुरुस्त केला पाहिजे, चीड व तिरस्कार पुसून टाकला पाहिजे, असें त्याला वाटलें. म्हणून त्यानें खिशांतला रुमाल काढला आणि चेहरा खसाखसा पुसला.

कॅप्टन्चें भाषण ऐकतांना त्याच्या मनांचा ताबा मृत्यूनेंच घेतला होता. वेगवेगळ्या प्रकारचीं मरणें त्याला आठवत होतीं. एवढेंच नव्हे तर आपण त्या सगळ्या मरणांनीं मरतोय्, असं त्याला वाटूं लागलं. छातींत दुखतंय्, असं किंचाळत चेहरे वेडेवाकडे करणारा तो–भर दुपारी ग्राउंड्वर परेड् करतांना फिट् येऊन कोसळणारा तो–मोटरखालीं व रेल्वेखालीं झालेले त्याचे तुकडे आणि एखाद्या वेश्येकडे किंवा दारूच्या गुत्त्यावर झालेला सुऱ्याचा एकच वार, आणि त्याची बाहेर लोंबणारीं आंतडीं–सगळीं दृश्यें त्याच्यापुढें गर्दी करूं लागलीं. मग त्याच्याभोंवतीं उभ्या असणाऱ्या त्याच्या मित्रांचे चेहरेहि त्यांत मिसळले आणि त्याला वाटूं लागले कीं बॉंबिंग्नें छिन्नविच्छिन्न झालेल्या शहरांतून आपण फिरतो आहोत, आणि जिथे तिथे प्रेतें दिसताहेत - स्ट्रेचर्वर घातलेलीं, लुंगी नेसवलेलीं, कपाळाच्या मधोमध काळा पॅच् असलेलीं, सितारामसारखीं.

एकाएकीं त्याला आठवलें, सीताराम परक्या ठिकाणीं गेला होता. इथे त्याचे म्हातारे आईवडील नव्हते. वर्षापूर्वींच त्याच्या आयुष्यांत आलेली व दोन तीन महिन्यांत त्याच्या मुलाची आई बनणारी त्याची बायको तिथें नव्हती. कुणीच नव्हतं. अगदीं एकटा. परक्या माणसांत त्याचें अस्तित्व संपलें होतें. मग काय उपयोग होता सीतारामनें शिक्षण अर्धवट सोडून कुटुंबाची जबाबदारी अंगावर घेतल्याचा? कां शिणला तो तरुणपणीं या माणसांसाठीं? शेवटीं तींहि कॅंप्मधल्या वा रस्त्यावरच्या कुठल्याहि माणसाइतकी परकीं–वा जवळची–ठरली, मग कशाला हे जन्मापासूनचे पाश? कशाला हा नाळेचा गळ्याभोंवतीचा फांस?

कुणी तरी त्याला जेवायला चल म्हटल्यानं तो भानावर आला. कुणी मेलं तरी जेवण कांहीं चुकत नव्हतं. पंडितजींच्या वेळची घटना आठवून त्याला क्षणभर हंसूं आलें. त्यावेळीं कुणी तरी म्हणालें होतें,

"आज हमे खाना नहीं लेना चाहिये!"

पण एक एक करीत प्रत्येकजण जेवून आला होता. मग नको म्हणण्यांत काय अर्थ आहे? उलट त्याचें सांत्वन करायला टपलेल्यांना आणखी एक संधी मिळाली असती. शिवाय त्याच्या लक्षांत आलें, कीं आपण जितका या विषयाचा विचार अधिक करूं, तितका तो कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें आपल्याला त्यांत अधिक अधिक गुंतवत जाईल. त्यानें स्वत:शींच ठरवलें, कीं आतां सीतारामला विसरलें पाहिजे. जास्तीत जास्त विसरलें पाहिजे. म्हणून त्यानें मेस्कडे पावलें वळवलीं.

तो टेबलाशीं बसला आणि प्लेट्स्मधले जिन्नस खातांना त्याची मोठी विचित्र स्थिति झाली. खातांना प्रत्येक पदार्थाच्या जागीं त्याला सीतारामचा मृत चेहरा दिसत होता. जणुं कांहीं सीतारामचा शिजवलेला चेहराच तो खात होता. आणि त्या वेळेला त्याला एकाएकीं वाटायला लागलें सडलेल्या प्रेताचा वासहि सगळीकडे भरून राहिलाय्. आणि त्याला खाणेंच काय, श्वासोच्छवास करणेंहि कठिण होऊन बसलें. जणुं कांहीं सीतारामनंतर त्यानें जिवंत राहाणें हा गुन्हा होता. मृत्यूपेक्षाहि तें जीवन अधिक भयानक होतें.

कॉट्वर तो पडला, तरी विचार त्याची पाठ सोडायला तयार नव्हते. दिवे मालवले गेले होते. त्या लांबच्या लांब बरॅक्मधील ओळीनें लागलेल्या त्या सत्तरऐंशी कॉट्स्–त्यांच्यावर आडवे झालेले अस्पष्ट कॅडेट्स्–सगळ्यांना गाढ झोंप लागली होती. त्यांनीं मृताच्या आत्म्याच्या शांतीसाठीं प्रार्थना केली होती. ते कदाचित् सीतारामच्या बायकोला देण्यासाठीं पैसे गोळा करतील, चर्चा करतील, आठवणी काढतील, पण तरीहि दररोज रात्रीं ते झोपतील, दररोज दुपारीं जेवतील, संध्याकाळीं फिरायला जातील व मनांत येईल तेव्हां आपआपल्या बायकांबरोबर मजाहि करतील.

फक्त त्याचें जीवन विश्वासाच्या देठापासून तुटून वेड्या वादळांत भिरभिरतें आहे. तोल सांभाळायचा त्यानें आतां कितीहि प्रयत्न केला तरी फाटून चिंध्या चिंध्या होऊन कुठल्यातरी काळोख्या कोपऱ्यांत पडून राहीपर्यंत हें आतां असेंच भिरभिरत राहाणार... भिरभिरत राहाणार. ●●●











—मुकुंद पंडित

**'मुंबईर्ची मानसं' ह्या भाऊ बेलदाराच्या तमाशाच्या बारींतली जनी जतकरीण भांडून निघून गेली. "आतां म्हैसगांवच्या पाटलाचं आवतण घ्येनार कसं?" म्हणून भाऊ चिंतेंतच होता. त्याची चिंता कुणीं व कशी बरं दूर केली?**

**—वाचा आणि खदखदून हंसा. गोपाळासारखं!!**

**अन्** एका रातच्याला कांहींच्या वाहीच झालं आन भाऊ बेलदाराशीं तडातडा भांडून जनी जतकरीण तमाशाच्या वगांतून चालती झाली. आतां जनी जतकरीण जाणं म्हंजी हलकी सलकी गोष्ट हाये होय? 'मुंबईची मानसं' ह्या भाऊ बेलदाराच्या हातखंडा खेळांतली बिजलीच ती! भाऊ बेलदाराला नाहीं तो घोर लागला व तो पालीच्या पोटासारखा पांढरा शिप्पट दिसूं लागला! आतां कसली आलीय् 'मुंबईची मानसं' अन् काय? कोन फुडं होनार, मागल्लं कर्जपानी कसं सारायचं, रोजची संगीत बारी कशी उभी रहायची? छ्या! भाऊ बेलदार डफ पोटाशीं घट्ट धरून सत्ताड उघडया डोळ्यांनीं समोरच्या भित्ताडाकडं बघत मुड्याभानी गुमान बसून राहिला! इचार करून करून बेलदाराचं डोचकं फुटाया झालं. भाऊ किती वेळ ताठरून तसाच बसला असता काय की, पग एवढ्यांत नाथा सोंगाड्या भाऊपुढं घावरा घुबरा होऊन उभा ठाकला.

"भाऊ" नायानें हाळी दिली. पर एक नाहीं अन् दोन नाहीं!

"अव भाऊ" नाथानें परत जोरशांत हांक मारली.

"अं?" एकदम दचकून भाऊच्या हातांतला डफ दाणकन जमिनीवर आदळला.

"म्हैसगांवाहून सांगात्ता आलाय."

"काय म्हून?" भाऊनी तोंड वर केले.

"गाड्या आनल्यात नव्हं कां"

"गाड्या? अन् कशापायीं?"

आता मात्र नाथा चिरडीला आला. डाव्या हाताच्या तळव्यावर उजवा हात चोळत तो दांत ओठ खाऊं लागला.

"घ्या! अव भाऊ तुम्हास्नी झालंय तरी काय आज? कुशाबा पाटलाला शबूद दिला नव्हं कां तुमी? म्हैसगांवला फड जाया होवा आज म्हणल्यापरमाणं."

"नाया, तूच बोलतोस नव्हं कां हें? माझी मस्करी आरंभली जनुं तूं? आर, इथं कोन घोरांत पल्डोय मी, आन् म्हैसगांवला चला म्हन! त्येस्नी बिनघोर सांगून टाक, न्हाई जमायचं! कुशाबा पाटलास्नी सांगा म्हनाव."

"भाऊ, शबूद म्हंजे शबूद! आपन वचनाला जागलं पाईजे. कुशाबा पाटीलबी अक्षी मालदार हाये, आपली सम्दी मागल्ली कसर निघल!"

"आर, व्हय खरं, पर आपली जनी असती तर अक्षी भुंग्यावानी घुमावला असता कुशाबाला. देणं पानी पार भागवून वरकडी गोप काढलं असतं पाटलाकडनं. जनी गेली अन् भाऊ सपशेल बुडाला." भाऊनें कपाळाला हात लावला.

"एक इचारू कां भाऊ, ह्या कुशाबानं जनीला सोता पाहिलंय कां?"

"नाय बा! तिची कीर्तीच तशी होती" नाथा सोंगाड्या एकदम तीनताड उडाला.








"भाऊ, ऱ्हाट म्हनून तयारी करा बघू निघायची. उग राडा घालत बसू नगा आता."

"म्हंजी ?"

"जनी हाय, इथंच हाय ?"

"कुठाय ?"

"भाऊ, आज घा वर्स तुमचं मीठ खातोय. तुमची अब्रू ती आमची."

"काय अर्थ कळंना गड्या !"

"तुम्हास्नी न्हाय कळायचा त्यो. तुमी आपलं डफ अन् तुणतुणंच वाजवत बसा."

"उगी, नमनांत त्याल नगं आता नाथा, सांगून टाक बघू झटक्यांत. जीव टांगणी उगी लागलाय कवाचान् माजा."

मग नाथा एकदम भाऊ बेलदाराच्या कानीं लागला. पंधरा मिनिटें दोघेहीं कुचुकुचु करीत होते. इच्चार ठरला !

"घा टाळी आता भाऊ ! म्हैसगांव बेस गाजनार आता, अन् कुशाबा पाटीलबी."

"अर, पर पोरा, हा इस्तवाशीं खेळ हाय, कसं जमायचं ? आगींतून फुफाटयांत...."

"भाऊ, बिनघोर ऱ्हा म्हून सांगितलं ना ? चला आटपा आता. मी कपडं बदलून येतो. निघाया होव. ऊन तावाया लागलंय." थोड्याच वेळांत भाऊ बेलदाराचा तमाशाचा संसार दोन बैलगाड्यांत भरला गेला व लगोलग चापून चोपून इरकली लुगडें नेसून 'जनी जतकरीण' गाडीवानाशेजारीं अंग चोरून जाऊन बसली व घुंगरांचा गोड मंजुळ आवाज करीत गाड्या अहेरवाडीच्या वेशीबाहेर हळुहळू निघाल्या. भाऊ बेलदार जनी जतकरणीकडे मोठ्या कौतुकानें पहात हनुवटीवर तळहात टेकवून विचार करीत स्वस्थ बसले. जनी जतकरीण, कुशाबा पाटील, म्हैसगांवांतली वारी, पाहुणचार. दौलतजादा, हात-खंडा खेळ 'मुंबईची मानसं' हजार तऱ्हेच्या विचारांनीं भाऊ बेल-दाराचं डोकं खिळखिळं करून टाकलं होतं. अन् ह्या विचाराच्या गुंगींत त्यांचा जो डोळा लागला त्ये पार म्हैसगांवची वेस आल्यावरच भाऊ बेलदार खडबडून उठले.

'हो हो' करीत गाड्या म्हैसगांवच्या धर्मशाळेसमोर उभ्या करण्यांत आल्या.

"हं, काय भाऊ, परवास व्यस झाला नव्ह ? गाड्या अलत्या कां येळेवर ?"

डोक्यावर हिरवा जरीचा कोल्हापुरी फेटा, तलम धोतर, पांढरा स्वच्छ 'टिनोपाल' नेहरू शर्ट, दोन्ही हातांत चार चार हिऱ्याच्या अंगठ्या, सोन्याचीं बटणें व डाव्या मनगटावर पिवळ्या धमक सोन्याचीं जाड सलकडी, अशा रुबाबांत कुशाबा पाटीलानें भाऊंचें स्वागत केलें. त्यांच्या कानांतल्या 'हिना'च्या बोळ्याचा सुगंध भाऊ बेलदाराच्या नाकांत घुसून त्यांचा जीव कसनुस होऊ लागला व्हता !

"न्हयं मालक अश्शी झ्याक वेवस्था झाली. रस्ताबी सोयीचा व्हता" भाऊ बेलदार हळूंच गाडींतून खालीं उतरले व त्यांची मानसं गाडींतून पसारा काढू लागली.

"अव भाऊ, हा काय यडाचार ? तुमी सोता हमाली करता ? ऱ्हाऊ द्या. अरे ए मुडदाडांनो माकडावानी काय बघत बसलांत माझ्या त्वांडाकडं ? सामान उतरता येईना व्हयं तुमास्नी ? पावणं मानसाला उगी तरास ! चला सामान उचला एकेक झट म्हून" बाजूच्या झाडा-खालीं लांकडी पेटीवर बसलेल्या तुळसा व जनी जतकरीण ह्यांच्याकडं बघत व मिशीवर पीळ देत आपल्या लोकांना कुशाबा हुकूम देत होते.

"हं, भाऊ वारी जोरक्यांत हाय म्हना की !" कुशावानें पहिला खडा टाकला.

"हाय, खंडोबाची कुरपा" भाऊ बेलदार विनोदानें हंसले.

"फार दीसापासून मी इचार करीत व्हतो, इक्ती धमाल उडव-लेल्या भाऊ बेलदाराचा वग आनायचाच आपल्या गांवांत. आता अहेरवाडींत भाऊ बेलदार आल्यावर म्या सोडीन व्हय ?"

"तसं हौशी पाटीलबी लागल्यात तुमाआणी." कुशाबांची छाती दीड इंच फुगली !

"बाकी पाटील, आमचा खेळ 'मुंबईची मानसं' एकडावच बघाल, तर आख्ख्या म्हैसगांवास्नी याड लागल !"

"अन् ह्या खेळांतली तुमची ती जनी जतकरीण कुठाय ? फार ऐकतोय तिच्याबद्दल." जनीचं नांव काढल्याबरोबर भाऊ थोडेसे दचकले. पण तेवढ्यांत सांवरून ते म्हणाले.

"हा त्याच्या ! जनी व्हय ? अव ती काय झाडाखाली बसलीया तुळसासंग ! गोरीपान ! हिरव्या साडीची."

"बोलवा कीं भाऊ वाईच."

"व्हय. ए जने, तुळसा, अर, हकडं या ना. पाटील बोलाबत्यात. तकडं काय बसलांत मगाचधरून ?"

जनी लाजत मुरकत अशा टेचांत कुशावांच्या पुढं येऊन उभी राहिली कीं म्हैसगांवचा कुशावा पाटील बरफावानी गारीगार पडला ! शेवग्याच्या हिरव्याजरद शेंगेवानी लवचीक सडपातळ बांधा, डाळींबी लालचुटुक पातळ जिवणी, उभार, उफाळल्यागत छाताड, जणु पिकल्यालं टामाटुच तोंडावर धाडकन फेकल्यापरमाणं लालबुंद तजेलदार चेहरा, एका ओळंब्यांत वसलेलं पांढरें फेक भोपळ्याच्या बियाचं जनु असें परमाणशीर स्वच्छ दांत !

"पायलागी धनी."

जनीनें पाटलांना खालीं वाकून मुजरा केला. पण पाटलांचं लक्ष होतं कुठं ठिकाणावर ? जनीच्या सौंदर्यावर ते इतके बेहद्द खूष झाले होते कीं ताठरलेल्या डोळ्यांनीं व वासलेल्या तोंडानीं बराच वेळ जनी जतकरणी-कडं खुळ्यासारखं बघतच बसले !

"जने, 'मुंबईची मानसं' म्हैसगांवांत गाजली पाहिजेत ! बघ, पाटीलबी चोखांदळ हायेत ! सोनं हुईल तुझं" भाऊ बेलदारांनीं जनीची पाठ थोपटली व जनी पायाच्या अंगठ्याकडं बघत खुदकन् हसली.

"अवो भाऊ, आता रस्त्यांतच गप्पा किती वेळ छाटणार ? दमून भागून मानसं आलीत. चला आंत आराम घ्या. फराकत झोंप काढा तोंवर ! लगेच च्या वाढून देतोच झट म्हनून. आजच्याला कोंबडंबी हाय वाड्यांत, घंट्या दोन घंट्यांत जेवण ईल. लाजू नका हं ! लागल त्ये बिनघोर मागा. पाटील तुमचाच हाय ! बरं कां जना !"

हंसत हंसत कुशावांनी जनीकडे पांहिले व जनीनें मारलेला गोड मुरका पाटलांच्या रुंद छाताडांत खस्सदिशीं घुसला !

"गण्या, सख्या तुमी इथंच न्हावा. काय लागलं पडलं बगा पावणं मंडळींचं. मग, जाऊं मी भाऊ ? जना ?"

"या. मंग, धनी आच्चालाच लावायची नं बारी ?" भाऊ उठत म्हणाले.

"म्हंजी, वखत कशापायीं ? आज खेळ झालाच पाईजे भैरोबाच्या मैदानावर. येरवाळीच सम्दी कम्प्लीट तय्यारी करून ठिवलीया."

"मेहरबानगी."

परत एकदा जनीकडे बघून मोठ्या खुषींत कुशावा आपल्या जडशीर वहाणा 'कुर्रम् कुर्रम्' वाजवीत वाड्याकडे निघाले.

"नाथा, शेगडींत पाऊल तर टाकलंयस तू. पाय जळू दिऊ नगस ! ह्या भाऊची अब्रू तुझ्याच हातांत हाय." भाऊ बेलदार व नाथाची कुजबुज सुरू झाली.

"भाऊ, ह्या नाथा सोंगाड्याला घा वर्सांत अजावांत वळखला नाय तुमी. कराडचं पानी बगाच भाऊ ! जनीच्या तालमींतला बिबट्या वाघ हाय हा."

"खरंच नाथा, मला एक ठाव हाय म्हून ! नायतर तुझ्या रुपाकडं व शरीराकडं बगून कुशावाच काय, पर त्येचा बा बी पाठ सोडणार नाय तुजी. पर पोरा, हातचा राखून आस हं ! भांडं उपडं होऊ देऊ नगसं ! बरं, नाथा, बदल कीं कपडे आता. परत पाटलाकडलं जेवण हाय, तुझ्या लावण्या घ्यायच्यात. पाठ करायचंय तुळसाला, नवीन सोंगाड्या शिरप्याला थोडं दावायचंय. ढीग कामं पल्डीयंत."

"भाऊ म्हैसगांवच्या वेशीबाहेर वग पडेपर्यंत पातळ आन् हा टोप काडायचा न्हाय. एकडाव इस्तव उचल्ला म्हंजी उचलला ! दुसरं लुगडंच नेसतो आता. न्हाईतर आपन सम्दीजन बळीच्या बोकडागत म्हैसगांवांत कचाकच चिरले जाऊ !"

☆ ☆ ☆

भैरोबाच्या मैदानावर ही धमाल उडाली व्हती ! भाऊ बेलदाराचा 'म्यानेजर' बारकू बोराटे तमाशाच्या 'थेटरा'ची जातीनें व्यवस्था बघत होता. म्हैसगांवकरांना हटवता हटवता त्याचे टांके ढिले झाले ! भैरो-बाच्या माळावर बराबर साडेपांचच्या ठोक्याला झ्याकपैकी तरटाचे 'थेटर' तयार होऊन बारकूचा जीव एकदांचा भांड्यांत पडला व तो 'वाईच' टेकून हातांवर चुना तंबाकू मळू लागला. करकचून साडी नेस-लेल्या बांधेसूद जनी जतकरणीचा फोटो असलेल्या 'मुंबईची मानसं'च्या छापील जाहिराती म्हैसगांवांत वांटायला सुरवात झाली. व मोठ्या जाहिराती तंबूच्या तरटांना चिटकवण्यांत आल्या. तांबड्या, हिरव्या फेटेवाल्या म्हैसगांवकरांनीं जाहिरातीपुढं गर्दी करून सोडली.

येणार येणार म्हणून गाजलेला
भाऊ बेलदाराचा वग
**'मुंबईची मानस'**
आजच पहा ! अशी संधी दवडूं नका !
जिच्या लावणीमुळं व लावण्यामुळं
लोकांना वेड लागायची पाळी येते
अशी भाऊ बेलदाराच्या वगांत
'जनी जतकरीण' आज रात्रीं
'मुंबईची मानसां'त
तुमच्या गांवांत चमकणार !
गानकोकिळा— जनी जतकरीण.
अभिनेत्री — तुळसा तवकरी.
नाच— गोदा महाबळ.
हिरो — अंतू गांवकर.

**'डॉ. पशू'**

**बरं का, तुझ्याबरोबर पांच रुपयांची नोट असलेला कोणीतरी 'माणूस' हवा !**

विनोदमूर्ति — किशा रेळे.
सोंगाड्या — शिरपती खोत.
ढोलक्या — बाबूराव बनसोडे.
तुणतुण्या — रामू डोईफोडे.
मॅनेजर — बारकू बोराटे.
मालक — भाऊ बेलदार.
ति. दर : फॅस्ट क्लास ३ रु; खुर्ची १।। रु.
जमीन ८ आणे.

**विशेष सूचना** :– तरटाला भोंक पाडून कोणी फुकटचा तमाशा पहाताना दिसला तर त्याकडून भरपेट ८ आणं वसूल केलं जाईल.
वेळ रात्रीं ९।। वाजतां.

'थेटर'ची वेवस्था कप्लीट झाल्यावराबर बारकू ग्यासवत्तीची सोय करायला निघाला. येताना पाटलांना परत येळेवर येण्याकरता वाड्यावर सांगून येनार व्हता. इकडें धर्मशाळंत 'मुंबईची मानसं'ची जोरक्यांतं तालीम चालू व्हती व त्याचवेळीं भाऊ कसलातरी इचार करीत हीरीवर चिडचाप बसून न्हाईले व्हते ! "कसं व्हतंय, काय व्हतंय ? हा पहिला फड पार पल्डा म्हंजी जिकलुच ह्या पाटलाला! ह्या नाथा पोरावर सारी भिस्त ! काय पर पोर म्हंजे पोर हाय ! दुसरी जनीच !"

"भाऊ, उठा कीं आता. हीरींत उडी घ्यायचा इचार हाय जनु ! उठा बिगी बिगी ! आठ वाजाया आलंत. डफ, पेटी, तुणतुण मिळवून घ्याया होवं, परत रंगरंगोटी हाय. पाटील नऊच्या ठोक्याला येतो म्हनलेत." बारकू बोराट्यानें तंद्री मोडल्याबरोबर भाऊ बेलदार दचकून उठले.

"व्हय ! झालं सम्द वेवस्थेशीर ? तिकिटं हायेत नव्हं मागल्ली ?"
"व्हय जी."

"बारकू तूच गल्ल्यावर बस. मी बगतो लागलं सवरलं. चला, रंगवायला होवं आता." भाऊ बेलदार घाईघाईनं धर्मशाळेकडे निघाले व बारकू परत 'थेटर'कडं वळला !

थोड्याच वेळांत सगळ्यांनीं उभं राहून खंडोबाची आरती जोरक्यांत म्हटली. डोईवर केसांची भली उंच काळी टोपी घालून भाऊंनी दोन नारळ फोडले. सगळ्यांनीं आरती घेतली व खिरापतीचें खोबरें खात खात बेलदाराचा वग कुशाबा पाटलांच्या गाडींत चढला. भाऊ बेलदार दारावर पाटलांची वाट बघत बसले होते ताटकळत. तरटाच्या थेटरांत एकमेकांच्या उरावर पडत व्हती म्हैसगांवचं 'पावनं.' बाहेर तर जत्राच जमली व्हती जनु ! शेवटीं बोराट्यानें उरलेल्या मानसांला सपशेल बाहेर रेटून ढकललं ! साडेनवाच्या पुढं कुशाबा पाटील नेहमींच्या रुबाबांत 'थेटरा' वर आले.

"पायलागी धनी".

"भाऊ आज बगतोच तुमची जनी! कोन दमतंय बगू दौलतजादा दिऊन कां घिऊन! म्हैसगांवचं पानी हाय म्हनावं! आटणार न्हवं" भाऊ नुसते हसले. पाटील पुढच्या गादीच्या खुर्चीवर जाऊन बसले व नमन सुरु झालं ! जनी जतकरीणीची केव्हां लावणी सुरू होतीय, ह्या चितेंत पाटील चुळबुळ करू लागले. आणि पायांतल्या घुंगरांच्या झंकारांतच तुळसा, गोदांच्या पाठोपाठ जनीनें प्रवेश केला ! प्रत्येक हावभावावरोबर असा लाडिक मुरका ती मारे कीं पाटलांच्या अंगावर एकदम इचडा चढल्यागत तें शिवशिवें ! व दहा रुपायाची नोट पाटलांच्या प्रैरणींतून उडी घेई! जस जसा तमाशांत रंग भरूं लागला तसतसा भाऊ बेलदाराचा जीव सुपा-एवढा होऊं लागला ! अरे नाथा ! कुठं शिकलास तू ह्ये ? काय आवाजांत गोडी, नाचांतली फिरकत, तुझ त्ये गोरं रूप ! कश्या कश्यांत फरक नाय ! अगदीं जनीच दुसरी ! बस ! पोरा जिंकलं ह्या भाऊनं ! येळकोट येळकोट घे ! नाथाकडं बघून भाऊ 'विंग'मधून बोटें मोडत होते. प्रत्येक लावणीच्या आलापाला म्हैसगांवकरांच्या अधेल्या पावल्यांचा पाऊस पडत होता. 'मुंबईची मानसं' कमालीच्या बाहेर रंगली! जनाच्या लावणीचं स्वर गुणगुणत म्हैसगांवकर अडचाच्या ठोक्याला घरोघर परतले. भाऊंनीं अक्षी मीठ मोहऱ्यांनीं नाथाची दृष्ट काढली ! दुसऱ्या दीशी रामपहरांतच पाटलाकडून एक जरीचं पातळ, भाऊला फेटा व वर २५ रु. बिदागी आली. रोजचा खेळ पाटील सोडीनात व रोज दहादहाच्या दोन तीन नोटा सोडल्याशिवाय त्यांचा जीव राहीना ! त्यांना जनीनं पार वेडं करून टाकलं व्हतं ! आता बस ! एकदा जनीला गांठायचीच ! पाटील हाय मी म्हैसगांवचा ! इच्चार करून पाटलाचा ब्येत ठरला. भाऊ बेलदार मोठा घोरणी हं ! पाटलाचं पाणीं बराबर जोकलं भाऊनं ! तुळसाला मधं घालून जनीच्या नांवावर मोप भरून घेतलं ! आन् एक दीस दोपारचालाच येसकर धर्मशाळंत येऊन उभा राहिला.

"भाऊ, मालकाचा निरोप हाय."
"पाटलांचा व्हय ? काय ?"
"उंद्या समद्यास्नी वाड्यावर बोलावलं हाय, बकरं हाय."
"व्हय येतो म्हनाव."

"दोपारच्याला बाराला या, अन् भाऊ हकडं या" येसकरानं भाऊला हलकंच खालीं बोलावलं.

"काय अजून ?"
"पाटलांचा खाजगी निरोप हाय" येसकरानें इकडें तिकडे बघितलं
"फकस्त जनाबाई न्हाऊ द्या हतं कां ? कसं ? तुमास्नी जादा सांगाया नग."

भाऊ बेलदार मोठ्यानें हसलें व भाऊच्या हातावर टाळी मारून येसकर खुषींत परतला. दहादहाच्या पांच नोटा 'जनी'कडं भाऊनें सुपूर्त केल्या. धर्मशाळेंत भाऊ बेलदाराच्या तमाशाची खूप वेळ बैठक चालली होती. व निर्णय घेतल्याबरोबर प्रत्येकजण झटपट कामाला लागला.

* * * *

भाऊला दुसऱ्या दिवशीं जातीनें आमंत्रण द्यायला मोठ्या झोकांत पाटील धर्मशाळेकडे आले. अन् तिथला देखावा पाहून त्यांचें डोसकं गरगर भिरभिऱ्यावानी फिरू लागलं.

"इची बायलीला, भडवे गेलं वाटतं पळून रातच्यालाच! ती जनी तर पक्की इब्लीस निघाली. लुबाडलं माला दोनशाला."

"अवं पाटील, काय बडबडताय! अन् असं डोकं धरूनशान काय बसलात ?" (पृष्ठ ५६ वर पहा)








(पृष्ठ ३४ वरून)

घ्यावी. रथसप्तमीनंतर केळीच्या पानांच्या चिरकांडचा उडायला सुरुवात होते. वदामाच्या झाडाला पौषांत लाल आणि हिरवी फत्ताडी पानं फुटतात. लांबून तें झाड म्हणजे पांचू-माणकांचं तोरणच वाटतं. पांढरा चांफा निष्पर्ण समाधींत दंग झालेला असतो. सिवरीवर लालकेशरी फुलांचे तुरे फुलतात नि देवकावळे त्यांच्यांतला मध चोखतात. थंडीच्या दिवसांत आमचा पहिला उद्योग म्हणजे तडक मागीलदारच्या आंब्याखालीं बसून अंगावर उन्हं घ्यायची नि पुढयांत पाचोळा पेटवून शेकोटी करायची. अशा रामप्रहरीं अंग कसं आरपार ऊन निघतं. आंखडलेल्या बोटांचे सांधे उन्हानें सुटतात. थंडी पळून जाते. माघस्नान त्या बायाबापडयांना जमत नाहीं, धकत नाहीं, त्या मागीलदारच्या केळीच्या वनांत बसून सूर्यस्नान करतात. मागीलदार हें आंघोळीचें ठिकाण. तिथें आंघोळ केव्हांहि सावचितपणें करा, आनंदकक्षा वर्धमानच होणार. थंडीत गरम पाणी अंगावर घ्या, जीव सुखावतो. उन्हाळचांत वावीच्या जीवंत पाण्याच्या घागरी डोक्यावर ओता, जीव शांत तृप्त होतो. मात्र मागीलदारच्या केळींच्या बनांतल्या ओंघाळीचें खरें काव्य आषाढ श्रावणांतच प्रत्ययाला येतें. समोर समुद्राची गाज चाललेली असते. वारा अनावर होतो. आकाशांतून पर्जन्य घों घों कोंसळत असतो. आणि त्या चौफेर हल्ल्याला चुकवीत केळीच्या बनांत तुम्ही खूरमांडी घालून घंगाळचांतल्या गरम गरम पाण्याचे तांबे सर्वांगावर रिकामे करतां. तें उष्णोदक, देह पुलकित करणाऱ्या संवदेनाचें कारंजेच तुमच्या देहांत निर्माण करतें.

दुपारच्या वामकुक्षीची चवहि पाऊस नसेल तर मागीलदारींच निवांतपणें घेतां येते. अर्धवट पेंगणाऱ्या डोळचांवर भर श्रावणांत हिरवीगार शेतें आपली सळसळणारीं ओलीं बोटें ठेवतात, आणि पहाडासारखे पुरुष तुम्ही, पण ते सुद्धां त्या हिरवाळीचे वंदे होतां. माघांत त्याच शिवारांत वालाच्या पांढऱ्या फेनधवल फुलांच नि तागाच्या जर्द पिवळया फुलांचे तुरे सदैव डुलतांना दिसतात. क्वचित् कोठें विहिरीच्या आधारानें वांगिणी डुलत असतात. चंद्रकरांच्या रजतरसांत हें सारें सजीव विश्वजात जेव्हां सचैल न्हाऊन निघतें, तेव्हां सृष्टिसौंदर्याचें मोठें प्रत्ययकारी लोभस लेणेंच आपल्या चक्षूंपुढें प्रकटतें. मागीलदार तेंच. पण चांदण्याच्या अरुवार बरसातींत त्याचा कायाकल्प होतो. चांदणीरात्र म्हणजे मागीलदाराच्या वास्तुच्या जीवनांतील श्रृंगारपर्वच. दाही दिशा चिडीचूप झालेल्या आहेत, वारें निवांत पडलें आहे, आणि चंद्रबिंबाच्या लामणदिव्यानें कुठली तरी अज्ञात अशरीरिणी शक्ति धरित्रीच्या उजळलेल्या मुखचंद्राचें औक्षण करीत आहे, हें चित्र पहात असतांना ज्याची तंद्री लागत नाहीं, तहानभूक हरपत नाहीं, त्याची गणना चक्क पशूंत व्हावी.

मागीलदारचें विश्व हें असें बालकाच्या जावळासारखें मऊ मुलायम आहे. मेघांवर जशी प्रकाशाची छटा असते तशी त्याच्यावर ममतेची छटा आहे. पुढीलदारीं प्रतिष्ठितांची उठवस असते. मिजासखोरांचा राबता असतो. मिशीला असेल नसेल तें तूप लावून तिथें शब्द दिले-घेतले जातात. शब्दांची आतषबाजी होते. मात्र हातचें राखून ठेवून. महत्त्वाच्या मुद्यांच्या बाबतींत आळीमिळी गूपचिळी राखली जाते. कानीं भिकबाळी नसली तरी हाताचा पंजा कानापर्यंत उचलला जातो, कारण त्यायोगें बोटांतले सल्ले तरी लखलवतां येतात. तशांत दारीं वरपक्ष आलेला असला म्हणजे त्यांचा आवाज आढयाला लागतो. अशा प्रतिष्ठितांची बोळवणसुद्धां त्याच पायरीवरून, उसनें चंद्रबळ आणून कां होईनां, पण करावी लागते. मागिलदारीं मात्र प्रतिष्ठा हा पदार्थ वर्ज्य आहे. तिथेंहि तोऱ्यांत बोललें जाते, मानपानाचीं गणितें बांधलीं जातात, तिरंदाजी केली जाते. पण त्या शब्दांचा कणा बांबूच्या पेरासारखा टणक नसतो, तर सूर्यफूलाच्या देठासारखा, उर्ध्वगामी, लवचिक आणि टोंकाला आपुलकीचें प्रसन्न गेंद असणारा असतो. कारण बोलून चालून मागीलदार हें नरम रक्ताच्या बायाबापडयांचें दार आहे. रामप्रहरीं भूपाळया आणि रात्रीं करुणाष्टकें म्हणणाऱ्या आईचे, आजीचे, मावशीचे, किंवा म्हाताऱ्या काकूचे दार आहे. देशपांडयांच्या सूनेची पाळी केव्हां चुकली, वापटांच्या सूनेला डोहाळे कसले लागले आहेत किंवा किव्यांच्या कमेचें नेमकें वय किती आहे, ह्या परत्या अन्य विषयाची तिथें चलती नाहीं. बापू कुळकण्यांनीं चालून आलेल्या पांचव्या स्थळाजवळ किती बोटें हुंडा मागितला, हें गुपित इथें फुटलें आहे. सरदेसायांच्या नव्या नवलाईच्या लफ्फेदार सूनबाईनें बेळगांवास माहेरीं गेल्यावर सासरच्या मंडळींच्या नांवें कशीं बोटें मोडलीं त्या साग्रसंगीत मसालेदार वृत्तानें मागीलदारीं हलक्याच पावलानें पायधूळ झाडली आहे. वेडेकरांच्या छबूनें शिकवणीच्या मास्तरांच्या कोटाला गुलाबाचें फूल खोवलें ह्या वित्तंवातमीनें इथें आठपंधरा दिवस तरी जिभेला आंबट गोड चव आणली होती. कुणाची बायको कुणाबरोबर अधिक प्रेमानें बोलते, आणि कुणाच्या चहांत दुधाची धार जास्त सोडते, ह्याचा खासगी पंचनामा फक्त मागीलदारींच हलक्या आवाजांत होऊं शकतो. प्रतिष्ठितांची कातडीं, मनांत आणलं, तर ही वास्तु अगदीं पैजेवारी सोलेल! पण असें कधीं होणार नाहीं. घडणार नाहीं. पुढीलदारांत वधुपक्ष आला असला तरी त्याला अदबीनें, अगत्यानें वागवलें जावें, हें ज्यांच्या गळयांत अजूनहि अंडचांत असलेल्या चार लेकी आहेत, त्या मागीलदारीं तांदूळ निसडत बसलेल्या यशोदामामींना नेमकें कळतें. मतलबाच्या पोटीं कां होईनां, मागीलदाराजवळ गहिंवर आहे. गांवांत कुणी पहिलटकरीण अडली तर इथें होणारी संवेदना उमाळचाची असते. करुणेची असते. पदराआड कथली झांकून बायाबापडया ताकासाठीं येतात, त्या फक्त मागीलदारीं. पुढीलदारीं भिकारी आला तर कदाचित् विन्मुख जाईलहि. पण त्यानें मागीलदारीं आर्त हांक घातली, आणि त्याच्या खापरींत थालीपिठाचा चतकोरहि पडला नाहीं असें कधीं होणें नाहीं. मागीलदार हें असं सर्वांना आधार देतें. मोरीबाहेरच्या खांचरांतल्या आळवाच्या देठापासून अतिथीपर्यंत, मागीलदारीं सर्वांचा सत्कार होतो. म्हणून त्याचा सर्वांना आधार वाटतो.

गांवच्या दामू सोनारानें मोठ्या भपक्यांत लग्नाचा बार उडवला. सौरं गांवढं त्याच्या मंडपांत जेवून गेलं. बायकोला नांवाजून गेलं. पण अखेर त्याची बायको अपेशी ठरली. नवससायास, देवदेवस्की, वैद्यहकीम करूनहि तिची कूस उजवेच ना. दानधर्म, व्रतवैकल्येंही झालीं. पण निरुपाय झाला. सोनाराच्या घरांत पाळण्याची दोरी हलणार नाहीं हें निश्चित झालें. दामू सोनारानें दुसरें लग्न केलें. पूर्वीची उमेद नव्हती, पण आशा एकाच गोष्टीवर केंद्रीभूत झाली होती. घरांत पाळणा जोजवायला हवा होता. विशेष म्हणजे दामूच्या पहिल्या बायकोनेंच संमति दिली होती. पण दैव परत आड आले ! व्रतवैकल्यादि सर्व प्रकार झाले. पण हातीं मात्र कांहींच आलें नाहीं. त्या सवती बहिणीसारख्या एकदिलानें वागत. हंसत. खेळत. सर्व गांव त्यांची हुर्यो उडवी. त्या मात्र सदा प्रसन्न असत. एके दिवशीं ठेवणीतले कपडे नेसून त्या दोघीहि संध्याकाळच्या वेळीं मागीलदारीं आल्या. चार गोष्टी बोलल्या. घरांतल्या सव्वाष्णींना त्यांनीं हळदीकुंकू लावलें. स्वतःला लावून घेतलें. मोगरीचीं फूलें खुडून त्यांचा वास घेतला आणि त्या दोघीहि मागीलदारच्या फाटकांतून बाहेर पडल्या. आतां वीस वर्षे होतील ह्या गोष्टीला. पण त्या कधींच परत आल्या नाहींत. आणि त्या कुठें गेल्या हेंहि कुणाला माहीत नाहीं! अधून मधून मोगरीच्या सुगंधाची आठवण होते, त्याप्रमाणें त्यांच्या निरागस-हास्याचीहि होते. त्यावेळीं मनांत कुठें तरी, कांहीं तरी सलतें. त्या सालस, प्रसन्न पतिव्रतांना अगदीं शेवटच्या क्षणीं मागीलदाराचाच आधार वाटला होता काय ? त्यांचें पाऊल मागीलदाराची शींव ओलांडतांना क्षणभर अडखळलें काय ? त्यांचें मन अजूनहि इथें रेंगाळत असेल काय?

नेमकी ह्याच्या उलट अवस्था बापू गोगटयाची झाली. शिवणकामाचे मशीन विकत घ्यायला म्हणून तो मुंबईला गेला आणि कधीं नव्हे तो त्यानें "ब्रह्मचारी" सिनेमा पाहिला. तें निमित्त मात्र झालें, आणि त्याचें डोकें साफ कामांतून गेलें ! त्या पुरंध्रीचा त्यानें एकच ध्यास घेतला. तो चित्रपट पुन्हां पुन्हां पाहिला. होते नव्हते ते सारे पैसे अत्तराच्या वासासारखे उधळून टाकले. नातेवाईकांची धांवपळ झाली. विकत घेतलेले मशीन कंपनीला परत करून मंडळींनीं पैसे उभे केले आणि बापूची रवानगी वेडयांच्या इस्पितळांत केली ! आपलें नशीब उघडायला म्हणून मुंबईस गेलेला बापू गोगटा शेवटीं पागलखान्यांत खिचपत पडला. सुदैवानें तो सुधारला. बरा झाला. त्याला सोडण्यांत आलें. तेव्हां तिकडून निघून तो जो शहाणा होऊन गांवीं परतला, तो थेट मागिलदारीं येऊन हजर झाला, म्हणे ! मी बरा झालोंय्, मला ह्या विहिरीचं पाणी द्या प्यायला ! कां रे बाबा? कधीं नव्हेस तो नव्या जन्माचा वाचलास, हातींपायीं सुखरुप राहून, शहाणासुरता होऊन गांवढयास् परतलास, तो असा मागीलदारीं कां आडलास ? त्या वास्तूनें तुला मंत्र घातला होता ? त्या वास्तुनें तुला हाळी घातली होती ? त्या वास्तूंत तुझा जीव अडकला होता ? असेलहि कदाचित्. कारण मागीलदारच्या अंगणांत बसून तो घटाघटा पाणी प्याला आणि कायमचा बरा झाला ! त्यानंतर त्याला जीं चार पोरं झालीं, तीं आतां मागीलदारीं चिंचा पाडायला चोरपावलानें येतात !

असें हें जीवनानंदाचा प्रकाश प्राणांवर शिंपडणारें मागीलदार. बहुगुणी बहुचणी, सोशिक आणि सोईस्करसुद्धां. मलूल मनाला तें उत्तेजित करतें. उत्तेजित मनाला तृप्त करतें. त्या वास्तूची केवळ स्मृतिसुद्धां साऱ्या कर्मकटकटींचा क्षणार्धांत विसर पाडतें. मागीलदार आठवणं म्हणजे नकळत वेगळ्या गहिऱ्या काव्यात्म विश्वांत पाऊल टाकणं. विविध वेदनांचे, आवाजांचे, हर्षामर्षांचे आवर्त माझ्याभोंवतीं घोंघावतें आहे. मी मात्र गदारोळाच्या डबक्यांत बदकासारखा संथ पोहोंतोय. माझे पंख पाण्यांत आहेत. पण पाण्याचा स्पर्शहि त्यांवर ठरत नाहीं. मी त्यापासून पूर्णपणें अलिप्त आहे. माझ्या मनानें असें मानलें आहे कीं, हें सारें मी कोंकण किनाऱ्यावरील माझ्या घराच्या मागीलदारीं बसून लिहीत आहे. शैशवस्मृतींचा मळवट माखलेली पायवाट माझ्या पायाशीं भिडत आहे. चिंचेच्या फांदीवर साळुंकी बसली आहे. अनाम रानवेली वईच्या निवडुंगाच्या आडून फुलांच्या डोळयांनीं मिष्कील हास्य करीत आहे. आकाशांत ढग जमत आहेत, पांगत आहेत. बगळे उडत आहेत. वायुलहरी गळयांत गळा घालीत आहेत. ह्यांत आंब्याच्या मोहोराचा मादक सुगंध मिसळून एक नवी जादूची नगरीच निर्माण झाली आहे आणि तिच्यांत बसूनच मी लिहीत आहे. ●●●




मामा, हॉर्न दुरुस्त करा, कारण ब्रेक्स चालत नाहींत !




# सन्मान पुष्पें



## * ही तो ईश्वराची सेवा

"जे कां रंजले गांजले त्यांसि म्हणे जो आपुलें। तोचि साधु ओळखावा। देव तेथेचि जाणावा" असें म्हटलें जातें. पण साधु संतांच्या ह्या देशांत असें अस्सल साधुत्व आज दुर्मिळ होत चाललें आहे. साधुत्वाचा जयजयकार चालू आहे, पण साधु समाज, सर्वोदय समाज वगैरे प्रकार करूनही "साधुत्व"चें पीक भरघोस येतांना दिसत नाहीं. स्वातंत्र्यानंतर तर एक वेगळाच 'साधू' समाज मात्र ह्या देशांत तयार झाला. आणि आलेली प्रत्येक संधि तो साधीत बसला आहे. ह्या पार्श्वभूमीवर जेव्हां खरें साधुत्व, सेवापरायणता, त्याग, समर्पण दिसून येते तेव्हां मन आनंदानें भरून येतें. मान लवते आणि उत्स्फूर्त उद्गार तोंडातून निघतात–येथ असे देवाची वस्ती !!

साधुत्वाला नेहमींच मोठी किंमत द्यावी लागली आहे. त्रास सहन करावा लागला आहे. पण ह्या साऱ्यांचें मूल्य मोजल्यानंतर साधूत्वाचें 'सुवर्ण' उजळून येत आलें आहे. अलिकडेच अशा एका मोठ्या मनाच्या, मोठ्या कर्तृत्वाच्या व मोठ्या देहयष्टीच्या माणसाचें दर्शन घडलें. त्या अंतःकरणांत फक्त पराक्रम फुलतो. सेवा वहरते. त्याग बरसतो, प्रसिद्धि पराङमुखताही तिथें पाणी भरते. आणि फार मोठ्या स्वप्नांची समृद्ध सृष्टि तिथें विहरायला येते. आज '**बाबासाहेब आमटे**' ह्या व्यक्तीचें सर्वत्र कौतुक होते आहे. त्यांचा सत्कार होतो आहे. पण शून्यांतून एक नवें, आशादायी जग त्यांनीं निर्माण केलें आहे त्याचा तो गौरव आहे. रस्त्यानें जातांना भिकारी, महारोगी माणसें अगदीं ऑफिसच्या दारापर्यंत पिच्छा-पुरवितांना दिसतात. पण त्यांच्या चेहऱ्याकडे पाहून उरांत उपजते फक्त दया. वाटते फक्त कींव ? आणि मग फारच झालें तर दोन चार पैशांचा विसार देऊन ती भावना शमविली जाते. पण अशांची जीवनभराची सेवा करण्याची प्रतिज्ञा एखाद्या आजच्या सुशिक्षित, निरोगी शरीराच्या सर्व सुखें दाराशीं असतांना करणें व ती वर्षा-नुवर्षे पाळून त्या रोगांतून एक संपूर्ण नवें जग उभें करणें, ह्या गोष्टीवर चटकन् विश्वास बसत नाहीं. पण हें अशक्य वाटतें ते एक शूर-वीर पुरुषानें घडवून दाखविलें आहे. आमटे गुरुजी हें त्या शूर पुरुषाचें नांव आणि त्यांनें उभ्या केलेल्या तपोवनाचें नांव आहे आनंदवन ! पंडितजींपासून तो पु. ल. देशपांडयांपर्यंत साऱ्यांनीं ह्या मोठ्या कार्याचा गौरव केला आहे. आज आनंदवनांत कुष्ट-रोगांनीं जो नवा इतिहास घडविला आहे तो बाबासाहेबांच्या स्वप्नांवर स्वार होऊनच ! महाविद्यालयापर्यंत प्रगति त्यांनी केली आहे. आपल्या हॉर्नबी रोडवरचा एक महारोगी स्वच्छ झाला. त्यानें चांगले कपडे केले. भांग पाडला आणि तो कॉलेजांत गेला हें नुसतें स्वप्न रंगवून पहा, म्हणजे बाबसाहेबांच्या दिव्य कार्याची कल्पना येईल. वकिलीची परीक्षा पास होऊनहि त्यांनीं द्रव्याची पूजा बांधली नाहीं. सुंदर बायको लाभूनहि ते 'बायले' बनले नाहींत. मुलांच्या मायेनें त्यांना पंगु केलें नाहीं. अक्षरशः महारोग्यांची 'माती' हातीं घेऊन त्यांनीं त्यांच्या सुशिक्षित व सुंदर मूर्ति बनविल्या आणि हें सारें दयेपोटीं नव्हे तर कर्तव्यापोटीं ! उपकार म्हणून नव्हे तर धर्मसिद्ध व जन्मसिद्ध अधिकाराच्या भावनेनें ! शांतपणें हिमालयांत मोक्षसाधना होते तीही साधुत्वासाठीं आणि सतत कष्ट उपसत आनंदवनीं राबते तीही 'साधुता' च !! माणसांतल्या ह्या साधुत्वानेंच सीमित जगाला असीमाचा, भव्यतेचा, उदात्ततेचा साक्षात्कार घडविला आहे. '**हो तो ईश्वराची सेवा**' हीच त्यांची भूमिका दिसते. देवांची वस्ती उभी करणाऱ्या आमटे गुरुजींना अभिवादन ! ह्या अशा दीपस्तंभाच्या प्रकाशांतून आपल्याला नवा, तेजस्वी मार्ग दिसण्याची शक्यता आहे हें निर्विवाद ! ! !

## * विद्या वृद्ध होत नाहीं

**यंदा** पुण्याला प्रतिवर्षीप्रमाणें नरसिंह चिंतामण केळकर व्याख्यान-माला झाली. ती व्याख्यानमाला गाजेल, गरजेल अशी पुणेकर मंडळींना कल्पना नव्हती. कारण वक्ता वृद्ध होता, अपरिचित होता आणि पुण्यासारख्या चोखंदळ श्रोत्यांशीं त्याची गांठ होती. परंतु तो वक्ता












बोलला. आणि सुगंधाची जाहिरात करावी लागत नाहीं, सौंदर्याला मॅक्स फॅक्टर लागत नाहीं. उत्तम गाण्याला कुणाची शिफारसपत्रें लागत नाहींत– अगदीं तसेंच त्या वक्त्याच्या व्याख्यानाबाबत घडलें. सुगंधासारखी त्याची कीर्ति पुण्यांत वाऱ्यावर स्वार होऊन पसरली. आणि मग त्या विद्वानानें पुणें जिंकलें. वक्ता अपरिचित राहिलाच नाहीं.

त्या वक्त्याचें नांव आहे डॉ. पांडुरंग सखाराम पिसुर्लेकर. पणजी जवळच्या पिसुर्ले गावीं ३० मे १८९४ त ह्यांचा जन्म झाला. गोव्यांतच पोर्तुगीज राजवटींत त्यांचें शिक्षण झालें. कायद्याची पदवी मिळवूनही त्यांनी मास्तरकी पत्करली. कारण खऱ्याचें खोटें आणि खोट्याचें खरें करण्यापेक्षां खराखुरा इतिहास त्यांना लोकांना सांगायचा होता. तो शोधून काढायचा होता. १९२२ सालीं त्यांनीं शिवाजीवर लेख लिहिला– पहिला लेख ! पण त्यांनीं पोर्तुगीज दप्तराचाही उपयोग करून संशोधन केलें. त्यांच्या ह्या संशोधनानें आकृष्ट होऊन त्यावेळच्या सरकारनें "आर्किऑलॉजिकल डिपार्टमेंट" सुरू करण्याचा विचार केला व त्यावर डॉक्टर साहेबांची नियुक्ति केली. त्या खात्यांत ते १९६१ पर्यंत होते व त्यांनीं मराठे, मुसलमान पोर्तुगीज ह्यांच्या इतिहासाचें मौलिक संशोधन केलें व ग्रंथरचना केली. पोर्तुगीज, फ्रान्स ह्या देशांना भेटी देऊन अनेक दुर्मिळ कागदपत्र जमा केले. ते बहुभाषा कोविद असल्यानें तें संशोधन त्यांनीं मुख्यतः पोर्तुगीज-भाषेंतून मांडले असले तरी आतां ते मराठींत उपलब्ध होण्याची शक्यता निर्माण झाली आहे.

डॉ. पिसुर्लेकर ह्यांच्या विद्वत्तेला लोकमान्यता लाभली व राजमान्यताहि (परकीय राजवट असूनही) लाभली. १९२३ मध्यें लिस्बनच्या शास्त्रीय अकादमीचें सदस्य म्हणून त्यांची नियुक्ति झाली. १९३५ व १९६२ सालीं पोर्तुगीज राजवटीनें त्यांना किताबत देऊन सन्मान केला. १९५६ सालीं लिस्बन विद्यापीठानें त्यांना "डी लिट्" ही पदवी दिली व १९६० मध्यें पुन्हां तीच पदवी देऊन त्यांचा गौरव केला. कलकत्ता व मुंबई येथील रॉयल एशियाटीक सोसायटीनें त्यांना अनुक्रमें जदुनाथ सरकार सुवर्णपदक व कँबेल सुवर्णपदक देऊन त्यांच्या गुणांचा आदर केला. पुण्यास त्यांनीं पोर्तुगीज मराठ्यांच्या संबंधावर कितीतरी नवा प्रकाश टाकला आणि पुणें जिंकलें. गोवा मुक्तीनंतरचा हा लाभ फार महत्त्वाचा आहे. मुंबई विद्यापीठावर त्यांचीं नियुक्ति करून महाराष्ट्र राज्य शासनानें आतां एक फार मोटी संधि (त्यांना व आपल्याला) उपलब्ध करून दिली आहे. आज डॉ. पिसुर्लेकर सत्तरींत असले तरी त्यांची बुद्धिमत्ता, त्यांचे तेज, त्यांचें संशोधन हें चिरनव, चिरतरुण आहे ह्याचाच प्रत्यय पुण्यांत आला. अशा ह्या विद्वानाचे आम्हीं स्वागत व अभिनंदनही करतों.

## ※ नाटककार न्यायाधीश

**वसंत** शांताराम देसाई हे न्यायाधीश म्हणून महाराष्ट्राला अधिक परिचित असले तरी रसिकजनांना त्यांचा परिचय मात्र नाटककार, नाट्य समीक्षक, नाट्य–चिंतक म्हणूनच अधिक आहे असें मला वाटतें. मला स्वतःला कितीतरी वर्षें त्यांचा न्यायाधीश म्हणून परिचय नव्हता. कलेचें कलेशीं नातें असतें. त्याठिकाणीं अन्य व्यावहारिक नातीं गळून पडतात. निदान त्यांना गौणत्व तरी प्राप्त होतें असें मला वाटतें. वसंत

शांताराम देसाई हें नांव घेतल्यावरोवर त्यांचे न्यायालयीन निवाडे डोळ्यांपुढें येत नाहींत, तर त्यांचीं **मखमालीचा पडदा कलावंतांच्या सहवासांत, कलेचे कटाक्ष, नट, नाटक आणि नाटककार बालगंधर्व-व्यक्ति आणि कला** ह्या सारखें ग्रंथ आणि **विधिलिखित व अमृतसिद्धी** सारखीं नाटकें डोळ्यांपुढें येतात. वसंतरावांनीं हीं दोनच नाटकें लिहिलीं आणि गंधर्व नाटक मंडळीनें तीं १९२८ व १९३३ सालीं रंगमंचावर सादर केलीं. त्या नाटकांनीं म्हणावें तसें यश संपादन न केल्यानें वसंतरावांनीं पुढें नाटचलेखन बंद केलें. पण नाटक हाच त्यांचा आत्यंतिक जिव्हाळ्याचा विषय असल्यानें त्यांनीं नंतरच्या काळांत विपुल नाटच-लेखन मात्र केलें. त्यांच्या नाटकांतील गाणीं मात्र आजही लोकप्रिय आहेत. नाटचविषयक ग्रंथांना तर मराठींत मनाचें पान लाभलें आहे. चर्चिल चरित्र, व बर्लिनच्या वातम्या (कादंबरी) हीं दोन पुस्तकें त्यांनीं लिहिलीं.

साहित्यिक व नाटचविषयक कार्य करूनही त्यांनीं त्या क्षेत्रांत आपाततः चालत येणारे मानसन्मान मात्र टाळले. दिल्लीला ते नाटच परिषदेचे अध्यक्ष झाले परंतु जवळजवळ सक्तीमुळेंच ! सर्वसामान्य-पणें शांतपणें वाचन, मनन, लेखन हाच त्यांचा निदिध्यास आहे. ह्याचा अर्थ ते माणूसघाणे नाहींत. पण प्रकृति मात्र शांत, संयम अशा अभ्यासकाचीच आहे.

आज वसंतरावांनीं साठी पूर्ण केली आहे. त्यांचा व्यासंग चालूच आहे. प्रसिद्धीच्या प्रकाशांत न राहतां ते जे कार्य करीत आहेत त्यांत त्यांना सुयश लाभो व मौलिक नाटचसेवा त्यांच्या हातून घडो हीच सदिच्छा ह्या निमित्तानें आम्ही व्यक्त करतों.

## भाग्यवान लेखक, भाग्यवान कादंबऱ्या

**कांहीं** काहीं माणसें मोठीं भाग्यवान असतात. तशींच कांहीं पुस्तकेंही भाग्यवान असतात. कांहीं पुस्तकें प्रकाशांत येण्यापूर्वीच जप्त होतात, तर कांहीं प्रसिद्ध होतांच 'इतिहास' घडवून जातात. अलिकडच्या काळांत असे चमत्कार अधिक घडतात, असें दिसतें. काळही भाग्यवानच! "**चक्र**" आणि "**माणूस**" ह्या दोन कादंबऱ्या अशा भाग्यवान पुस्तकांत मोडतात (ही आपली म्हणण्याची पद्धत–खरे म्हणजे त्या ताठ उभ्या राहतात.) ह्या दोन्ही कलाकृतींनीं कांहीं नवा इतिहास घडविला खास ! **जयवंत दळवींची** चक्र ही पहिलीच कादंबरी तशीच **मनोहर तल्हार** यांची 'माणूस' हीहि पहिलीच कादंबरी ! दोन्हींचे प्रकाशक एकच – 'मॅजेस्टिक' चे केशवराव कोठावळे ! दोन्हीं कादंबऱ्या स्पर्धेसाठीं स्वीकृत होऊन प्रसिद्ध झालेल्या ! दोघांनाही महाराष्ट्र राज्य शासनाची पारितोषिकें मिळालेलीं आणि आतां दोघींनाही 'मॅजेस्टिक' स्पर्धेचेही बक्षीस मिळालें ! अनेक विक्रम प्रस्थापित केलेत ह्या लेखकांनीं व कादंबऱ्यांनीं ! त्या विक्रमी लेखकांचे आम्ही अभिनंदन करतों. त्यांच्या पहिल्याच कलाकृतींनीं त्यांनीं मराठी कादंबरीच्या क्षेत्रांत मानाचें पान मिळविलें आहे. आतां त्यांच्या-बद्दलच्या अपेक्षा उंचावल्या आहेत. ती 'उंची' ते राखतील असा आमचा विश्वास आहे.

## ❋ तिखट जीभेचा प्रेमळ माणूस

**ध्येयवाद** प्रखर असला, अंतःकरणांत अन्यायाबद्दल चीड असली, मनांत 'मऱ्हाठी' रग असली कीं माणूस आपलें तेज व्यक्त करून जातोच जातो. एरव्ही तें व्यक्तित्व शांत, संयत जीवन जगेल. पण अन्यायाचे वेळीं मात्र त्याची प्रखरता इतरांना जाणवून देईल. संयुक्त महाराष्ट्राचें आंदोलन झालें आणि अंगभूत तेजस्विता प्रगट करणारीं अनेक माणसें पुढें आलीं. आंदोलन संपल्यावर तीं जीं माणसें आपल्या आपल्या जागीं जाऊन बसलीं व कामाला लागलीं.

'प्रबोधन' कार ठाकरे ह्यांच्या बाबत हेंच म्हणतां येईल. त्यांची जीभ जरा तिखट आहे. तिचें वळण काहींसें वांकडे व क्वचित प्रसंगीं 'फट-कळ' ही आहे. पण अंतःकरणांत ध्येयवादित्व आहे. मनांत निष्ठा आहेत. अन्यायाबद्दलच्या चीडीतूनच हें सारें घडते. एरव्ही माणूस शांत, सरळ ! आपण बरें कीं आपलें काम बरें ही वृत्ति ! सं. म. आंदोलनांत त्यांच्या वाणी लेखणीनें फार काम केलें. महाराष्ट्राची मागणी कशी तर्कशुद्ध आहे हें पटवितांना त्यांची तर्कबुद्धि खुलत असे. उपहास, विडंबन, थट्टा करीत करीत त्यांचें वक्तृत्व चालतें. "प्रबोधन" पत्र बंद पडलें असलें तरी त्या पत्रानें जें 'व्यक्तित्व' उभें केलें त्यामूळें आजही ठाकऱ्यांना 'प्रबोधनकार' म्हणूनच म्हणतात. त्यांच्या सेवेचा नुकताच सन्मान करण्यांत आला. त्यांतच आमचें हें एक सन्मान पुष्प !

**—आदित्य**

---

( पान ५१ वरून )

"अरे गोपाळा, कंदी आला अहेरवाडीहून. ?"

"कालच रातचाला. पर तुम्हास्नी झालयं तरी काय?"

"काय व्हायचंय? बुडालो नव्हं कां दोन अडीश्शाला ! जनी जतकरीण आली व्हती! काय झालं काय कीं! रातच्यालाच पळाली मंडळी !"

"जनी? म्हणजे भाऊ बेलदाराचा तमाशा आला व्हता ?"

"व्हय! गोपाळा, पन तू कांहींहीं म्हन्! जनी म्हंजी जनी! पार येडा झालो बघ आपून तर!"

"कुशाबा, खरोखरच तुम्हाला वेड लागलंय. कुठली जनी म्हणताय?"

"जनी जतकरीण ! ती गोरीपान सडपातळ! अहाहा."

"दिवे ओवाळा पाटील तुमच्या फुडं! अव ती जनी न्हाई ! खरी जतकरीण केव्हांच भांडून गेली भाऊशी अहेरवाडीत ! "

"मंग ह्यो कोन?"

"पाटील, तुमचा येळकोट केला ह्या भाऊ बेलदारानं! अन, त्याच्या फडांत नाथा सोंगाडी अगदीं थ्याट जनी जतकरीण सारखाच रूपवान व गोड गळ्याचा हाय! घातली टोपी तुमास्नी पाटील!"

म्हैसगांवचे कुशाबा पाटील ताठलेल्या डोळ्यांनीं धर्मशाळेकडं बघत हीरीच्या कट्टयावर गुमान बसून ऱ्हाइले व गोपाळा प्वाट धर घरून हसत सुटला. ● ● ●









**समाजकारण**

# आजचा धर्म

**धर्म,** समाज आणि राष्ट्र हें जर गतिमान असेल, प्रगमनशील असेल तरच तें जगते, टिकते, मोठेंही होते. बदलत्या परिस्थितींत जो धर्म समाजाची धारणा करायला सहाय्य-भूत होतो तोच धर्म ह्या संज्ञेला पात्र ठरतो. जें राष्ट्र नव्या कल्पनांचें स्वागत करण्याची क्षमता धारण करते, परिस्थितीनुसार जें जें आवश्यक व 'धर्म्य' असेल तें स्वीकारण्यास सिद्ध होते तें राष्ट्र कांहीं नवें 'तेज' व्यक्त करूं शकते. कांहीं मूल्यें सनातन असतात आणि कांहीं व्यवहार परिस्थिती सापेक्ष असतात. विशेषतः आजच्या जगांत ज्यावेळीं परस्पर संबंधांतून व संघर्षांतून विविध वंश एकत्र येत आहेत. अशा वेळीं त्या त्या काळाला व परिस्थितीला अनुसरून कांहीं नवे कायदे, नवे नियम, नवा धर्म स्वीकारणें हें कर्तव्य ठरतें. आज आपल्या समस्या ह्या केवळ आपल्या पुरत्या मर्यादित रहात नाहींत—आपली इच्छा असो वा नसो. त्या समस्यांचे कांहीं बरे वाईट परिणाम शेजाऱ्या—पाजाऱ्यांवर होत असतात वा इतरांच्या समस्यांचे कधीं कधीं आपल्या-लाही वळी व्हावे लागते. दुसरें महायुद्ध संपलें. पण त्याची झळ जवळ जवळ साऱ्या जगाला बसली. जपानमध्यें, फ्रान्समध्यें वा जियें जियें विजेत्री सेना गेली तियें तियें अनौरस संततीचा प्रश्न उभा राहिला. आणि मग त्या त्या देशांना आपले कायदे बदलावे लागले. **"नियमन मनुजासाठीं ? मनुज नव्हे नियमनासाठीं जाणा"** हें कविवचन सर्वच सद्धर्मांचें अधिष्ठान आहे. मानवता ही वंदिस्त वस्तु नाहीं. तो एक प्रत्यक्ष प्रत्ययाचा विषय आहे, ह्याची अशा वेळीं जाणीव होते.

अन्नटंचाई, महागाई, घरांचा प्रश्न वगैरे अनेक प्रश्नांच्या अनुषंगानें सध्यां आपल्या देशांत लोकसंख्येचा प्रश्नही चर्चिला जात आहे. वास्तविक हा प्रश्न कांहीं नव्याने निघालेला नाहीं. स्वराज्यानंतरच्या काळांत सतत भेडसावीत राहिलेला हा प्रश्न आहे. विशेषतः नवोदित राष्ट्रापुढील अनेक जटिल समस्यांत भर म्हणूनच ह्याही प्रश्नाचा त्यांत समावेश झाला आहे. ही समस्या अनेक समस्यांची जन्मदात्री म्हटली पाहिजे. कारण अन्न, वस्त्र आणि निवारा ह्या ज्या माण-साच्या मूलभूत गरजा आहेत आणि त्या गरजा भागविण्याचें जें दायित्व शासनावर आहे, (असें आपण मानतो व मानलें जातेंही—सर्वत्र) त्या कार्यातंत्र मुळीं ह्या प्रजोत्पा-दनाचा संबंध येतो. वस्तुतः 'देवाची करणी आणि नारळांत पाणी' असें आपण म्हणतो. सृजनाबद्दलही असेंच म्हटलें जातें. परंतु जसजशी विज्ञानाची प्रगति होत जाते आहे, आणि एकूण जीवन विषयक भाबडचा कल्पनांना तडे जात आहेत, तसतशा ह्या श्रद्धा मुळापासूनच ढवळून निघत आहेत. वंशवृद्धीबद्दलच्या समस्या ह्या आतां एका कुटूंब, गांव वा समाजापुरत्या मर्यादित राहिल्या नाहींत. त्या देशाच्याही मर्यादा मानीत नाहींत. त्यामुळेंच 'कुटुंबनियोजन' हें एका देशाचेंच साधन राहिलें नसून साऱ्या विश्वाचेंच तें एक महत्वाचें अंग बनलें आहे. 'कुटुंबनियोजन' ह्या विषयांत आतां शास्त्रीय दृष्ट्या वरीच भर पडत आहे. अनुभवांतून तें शास्त्रही प्रगत होत आहे—आणि अनेक नव्या कल्पना स्थिरावता हेत. कुटुंबनियोजनाचें एक अविभाज्य अंग म्हणून 'गर्भपात' हा विषय येतो. कारण 'संयम' हा नियोजनाचा खराखुरा (व चांगलाही) उपाय असला तरी माणसें 'शुकमुनी' पासून अनंत योजनें दूरच असतात. (आणि म्हणूनच "शुकासारिखे पूर्ण वैराग्य ज्याचें" असें रामदासांसारख्या एखाद्या 'वैराग्या' बाबत म्हणण्याची सोय होते)—अशा परिस्थितींत 'पाऊल घसरलें' तर 'उपाय' हवाच ! ह्या दृष्टीनें 'गर्भपात' हा अपरिहार्य ठरतो. शस्त्रक्रियेचाही उपयोग होतो. परंतु कांहीं एका विशिष्ट परिस्थितींत गर्भधारणा झाली तर अनावश्यक संततीचें जनन होऊं देणें हें केवळ कुटुंबाच्याच दृष्टीनें नव्हे तर सामाजिक दृष्टीनेंही हानिप्रद असते. कुटुंबनियोजन गर्भपात—आणि समाज हा विषय फार मोठा व महत्वाचा आहे हें जाणून पुणें येथें २२ नोव्हेंबर १९६४ रोजीं ह्या प्रश्नांचा सांगो-पांग विचार व्हावा ह्या हेतूनें एक परिसंवाद आयोजित करण्यांत आला होता. परिसंवादांत डॉ. वानू कोयाजी, प्रा. हेमलता आचार्य, डॉ. रोशन मास्टर, डॉ. कुमुद दांडेकर, पं. रघुनाथ शास्त्री कोकजे, सौ. मालती बेडेकर वगैरे नामवंतांनी भाग घेतला होता. त्या विषयाचें महत्व जाणून त्यांतील कांहीं निवडक लेख देशमुख प्रकाशनातर्फे आतां प्रकाशित करण्यांत आले आहेत. धार्मिक, मानसशास्त्रीय, कायदा दृष्ट्या, लोकसंख्यादृष्ट्या शरीर दृष्ट्या, मानवतेच्याही दृष्टीनें ह्या प्रश्नां-संबंधीं विविध तज्ञांनीं अतिशय मौलिक विचार मांडले आहेत.

गर्भपाताचा कायदा ह्या देशाच्या शास-नानें केला पाहिजे असें महत्वपूर्ण प्रतिपादन त्यांत आहे. परंतु त्यांत केवळ भावनावेग नाहीं. प्रा. मधुसूदन गोखले ह्यांनी ह्या विष-याच्या अनुषंगाने केलेल्या डोळस अभ्यासाचें सार सांगितले आहे. गर्भपातास खुला पर-वाना असलेला जपान हा जो देश आहे त्याची १९४७ ची २७,१०,००० ही लोक-संख्या १९५७ सालीं १५,६३,००० इतकी घटली हें सत्य सांगून त्या योजनेंतल्या कांहीं अनुभवसिद्ध उणिवाही त्यांनी स्पष्ट केल्या आहेत. रशिया, स्कँडिनेव्हियन देशांतील परिस्थितीचीही अभ्यसनीय चर्चा त्यांनी

केली आहे. त्यांचा लेख मुळातच वाचण्यासारखा आहे. सौ. इरावती कर्वे, मालतीबाई बेडेकर, कुमुदिनी दांडेकर, शैला सोहनी, तारा वस्तीकर व शकुंतला परांजपे ह्या विचारवंत भगिनींनींही ह्या आत्यंतिक जिव्हाळ्याच्या सामाजिक विषयावर स्त्री निरपेक्ष व समाजहितैषी भूमिकेंतून आपले सडेतोड विचार मांडले आहेत. ह्या परिसंवादांत मला जो विशेष आढळला तो हा कीं, त्यांत ह्या प्रश्नाच्या सर्व बाजूंचा विचार मांडला गेला आहे. गर्भपाताला अनुज्ञा न दिल्यानें उत्पन्न होणाऱ्या अनेकविध सामाजिक समस्यांचें भयानक रूप सौ. मालतीबाई बेडेकर यांनीं 'या मुलांना वांचवा' ह्या लेखांत मांडले आहे. ह्या परिसंवादांत गर्भपातामुळें होणाऱ्या (स्त्रीला) शारीरिक व मानसशास्त्रीय त्रासाकडे साऱ्यांनी आवर्जून लक्ष दिलें आहे हाही एक त्याचा विशेष होय! डॉ. कोयाजी, डॉ. मास्टर व प्रा. सौ. आचार्य ह्यांनी इंग्रजींतून आपले विचार व्यक्त केले असले तरी त्यांतही हीच तळमळ व दूरदृष्टि दिसून येते. ह्या परिसंवादांत व्यक्त झालेल्या विचारांच्या अनुषंगानें त्यांतले उतारे देऊन कांहीं लिहिणें शक्य आहे. परंतु ते केवळ अशक्यच! पुण्याने केलेल्या एका चांगल्या व महत्वाच्या कार्याची ओळख सर्वांना करून द्यावी, मुळांतून ते लेख वाचण्याची ईर्ष्या वाचकांना वाटावी व एका मौलिक विषयाला चालना मिळावी ह्या भूमिकेनें केलेला हा प्रपंच! व्यापक भूमिकेंतून पाहिलें तर हें एक फार मोठें सामाजिक कार्य ह्या परिसंवादानें केलें आहे हें निःसंशय !!!

## राजकारण

# अखेर मुखवटे गळून पडले

"तो मी नव्हेच" (वा त्याची भ्रष्ट नक्कल म्हणून आलेलें "मी तो नव्हेच") असं म्हणून काझीनें पुष्कळ सांगून पाहिलें. चेहऱ्यावरची माशीही उठणार नाहीं असा 'मवाळ' चेहरा करूनही आपण 'नट' आहोंत हें पर्यायानें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. जीं 'वेगवेगळीं नांवें' त्यानें घेतली होतीं तीं जणुं तो प्रथमच ऐकत होता, असा निर्विकार चेहरा करून आविर्भावही आणला. पण अनेक नांवें व अनेक धर्मांचें अनुयायित्व पत्करणारा 'काझी' अखेर 'काझीच' होता हें सिद्ध झालें आणि त्याला शासनांत जेवढी बसेल तेवढी शिक्षाही झाली...आणि खोटेपणाला, फसवणुकीला योग्य तें शासन मिळालें म्हणून संबंधित माणसें व सारा सत्प्रवृत्त समाज आनंदला. त्याच्यावर चांगलें (व चांगला पैसा मिळवून देणारे) नाटक झालें. कांहीं नवीन व गुणी माणसें प्रकाशांत आलीं.

राजकारणांतही अशीं नाटकें अधुनमधून होत असतात. कधीं त्या नाटकाचें नांव 'भावबंधन' असतें (शांततामय सहजीवन) तर कधीं त्याचें नांव असते "राक्षसी महत्वाकांक्षा' (तूर्त ह्याचा प्रयोग चीन प्रांतीं 'माओ' नामक कुशल दिग्दर्शनाखालीं चौ एन् लाय संगीत मंडळी करीत असल्याची इतिहासीं नोंद आहे). परंतु आपल्या देशाच्या राजकारणांत मात्र "तो मी नव्हेच" ह्या नाटकाचा प्रयोग गेलीं कांहीं वर्षं चालूं होता. नाटक कंपनींतली नट मंडळी मोठी कुशल, वाकबगार! विश्वसंचार करून रशिया, झेकोस्लोव्हाकिया, पोलंड, हंगेरी, क्युबा, चीन, वगैरे प्रांतीं ह्या नाटकाचा प्रयोग करून व त्या त्या प्रांतीं नांव कमावून ही कंपनी आली असल्यानें अभिनय पटुता त्या कंपनींत जणुं पाणी भरते आहे म्हणा ना! त्या नाटक कंपनीनें ह्या अज्ञ जनांचा उद्धार करण्याचे कंकण बांधून बरींच वर्षे झालीं. निरनिराळ्या प्रांतीं तिनें आपले लोकप्रिय प्रयोग केले. कांहीं प्रांतीं कंपनीला भलतेंच यश मिळालें. म्हणून प्रोत्साहित होत्साती कंपनी ह्या देशभर फक्त एकच नाटकाचे अधिराज्य असों द्यावें ह्या भूमिकेनें कार्यास लागली. सीनसीनरी चांगली असावी, प्रकाशयोजना आकर्षक व्हावी. अज्ञान झटपट दूर व्हावें–मनरंजनाबरोबरच मद्याची गुंगीही श्रोतृ–प्रेक्षक गणांवर पडावी म्हणून नवनवीन 'परकीय' तज्ञही बोलावण्यांत आले. त्यांच्या हाताखालीं अभिनेते तयार होऊं लागले. हें सारें मनरंजनासाठीं, अज्ञान दूर करण्यासाठीं, 'भल्यासाठीं', 'मुक्ती'साठीं (अंतिम–असं म्हणतात) चाललं आहे' अशी जाहिरात प्रांतोप्रांतीं फडकली. नाटकाचा प्रयोग फुकट होता. तिथें भेद नव्हता. त्यामुळें मुळांतल्या दरिद्री जनतेला तो प्रयोग कांहीं काळ बरा वाटला. माणसें फसलीही. भलेभले व बडेबडेही चकले. आणि '**हेंच–खरें नाटक**' म्हणून त्याची त्यांनीं खूप भलावणही केली. पण एक दिवस सारें जग ह्या नाटकांत दंग असतांनाच नाट्यगृहीं स्फोट झाले, दारें फुटलीं, दिवे मालवले गेले आणि लुटालूट झाली. लोक म्हणाले कंपनीचेच हे साथीदार! कंपनीच्या नायकानें सांगितलें "तो मी नव्हेच"!

शाब्दिक कसरती झाल्या. ती चोरी ही चोरीच कशी नव्हती. चोरांना, समजुतीनें घेतले तर, त्यांची चूक पटेल वगैरे. बरीच भलावण झाली. कंपनी फुटल्याचें नाटकही झालें. "आम्हींच सच्चे" वगैरे आव्हानेंही झाली. देवाच्या शपथा झाल्या. (पण चौकशी अंतीं एकाच्याही ओसरींत देव नव्हता; सारे होते तें रावण वंशाचेच फोटो असें कळलें) पण "कंपनीचें कांहीं खरे नाहीं" ही ठाम समजूत साऱ्यांची झाली. तरीही प्रयोग होतच राहिले. आपल्या शुद्ध चारित्र्याची ग्वाही आवडती आणि नावडतीही देतच राहिली. "**तो मेली हडळ आहे**" असं त्या एकमेकांना म्हणतच राहिल्या. आणि मग एके दिनीं भल्या पहांटे' 'तो मी नव्हेच' म्हणणारे अनेक काझी तुरुंगाच्या दारांत जाऊन बसले. आवडती रागावली. "नावडतीला सोडलें नाहीं तर मी सत्याग्रह करीन! पाहीन पाहीन आणि "गांव बंद" करून टाकीन म्हणून तिनें दम भरला. तरी "**मी हडळ नव्हेच**" असं ती धाय मोकलून बजावीतच राहिली. आणि मग सारे प्रेक्षक खदखदां हंसलें. खरे काझी सांपडले कीं सतप्रवृत्त समाजाला नेहमींच आनंद होतो. सांप्रत ह्या देशीं असा आनंद नांदतो आहे. ह्यानेंच केरळ कन्यकेला व बंगाली रमणीला नादीं लावले आहे. ह्यानेंच तेनाली ग्रामीं सुप्रसिद्ध नाट्यदिग्दर्शक माओ त्से तुंग व कुशल अभिनेते चाऊ एन् लाय यांचीं

अनुक्रमणिका

चित्रें लावली होती व हेंच माझ्या लग्नाचे पुरोहित म्हणून ग्वाहीही दिली, नव्हती काय?

अखेर नाटक कंपनीच्या बिऱ्हाडीं सांपडलें अराजकाचें कोठार आणि सारी कंपनी तूर्त 'सरकार दरबार'चा पाहुणचार घेत आहे हें सर्वांसी श्रुत आहे!

फसवणुकीचें हें नाटक अखेर संपलें! 'तो मी नव्हेच' म्हणत म्हणत 'अखेर ते हेच' हें पुराव्यानें सिद्ध झालें. म्हणून आम्ही प्रेक्षक बहुत तृप्त जाहलों.

## छेः! तूर्त कांहींच नको

**ह्या** देशाच्या शासकीय पक्षाचें अधिवेशन दुर्गापूर येथें भरलें आणि यशस्वीपणे पार पडले. ह्या अधिवेशनावर अनेक समस्यांची दाट पडछाया पडली होती. त्यांतल्या कांहीं फारच महत्वाच्या व एकूण राष्ट्रीय जीवनाची फारच संलग्न अशा होत्या. चीननें अणुस्फोट केला ही गोष्ट तशी हादरा देणारीच म्हटली पाहिजे. वस्तुतः चीन हें कांहीं पहिलेंच अण्वस्त्रधारी राष्ट्र नव्हे. रशिया, अमेरिका, इंग्लंड हीं राष्ट्रें ह्या पूर्वींच अणुसज्जच नव्हे तर अणुसमृद्ध झाली आहेत. पण त्याची चिंता जगाला अधिक वाटत नाहीं. परंतु आक्रमक प्रवृत्तीचा व मानवसंहारावर श्रद्धा असणारा लालचीन अणुसिद्ध झाला ही गोष्ट मात्र साऱ्या जगानें फारच "सीरियसली' घेतली. कारण आज अणुसज्ज असलेल्या राष्ट्रांपेक्षां चीनचा सारा पवित्रा वेगळा आहे. अधिक विस्तारवादी स्वरूपाचा आहे. विशेषतः चीन-भारत युद्ध अजूनही सरलें नसल्यानें ह्या प्रश्नाची दखल घेणें हें तर भारताचें कर्तव्यच होते. ना. लालबहाद्दूर शास्त्री ह्यांनी अधिवेशनापूर्वी (कॉंग्रेसच्या) भारताची भूमिका स्पष्ट केली. अण्वस्त्रधारी राष्ट्रांनी (रशिया-अमेरिका-ब्रिटन) बिगर अण्वस्त्रधारी राष्ट्रांना संरक्षक छत्री पुरविण्याचें आश्वासन द्यावें अशीही एक विनंति केली. आम्ही मात्र अण्वस्त्रें तयार करणार नाहीं असें त्यांनीं घोषित केलें. त्यावर बरींच माणसें अस्वस्थ झालीं. खुद्द कॉंग्रेस पक्षांतही ह्या विषयावर वादंग माजलें. आणि ह्याबावत पुर्नविचाराची मागणी करण्यांत आली. दुर्गापूरच्या अधिवेशनांत तो पुर्नविचार झाला, परंतु त्याला पुर्नविचार तरी कसें म्हणावें? अधिकृत म्हणून व्यक्त झालेल्या मतावर शिक्कामोर्तब करण्यांत आलें. ह्याही बाबतींत परंपरागत श्रद्धांचाच विजय झाला. फक्त एकच दिलासा त्यांत आहे कीं आम्ही कधींच अण्वस्त्रें तयार करणार नाहीं असें मात्र म्हटलेलें नाहीं. तूर्त तरी शांततेसाठीं अणूचा उपयोग ह्या धोरणाचा पाठपुरावा करण्यांत आला. वास्तविक अणुसज्ज होणें म्हणजेच अण्वस्त्रांपासून संरक्षण मिळविण्यासारखें आहे. अण्वस्त्र असणें आणि अण्वस्त्र वापरणें त्यांत फार अंतर आहे. पण नुसत्या असण्याला सुद्धां आज किती महत्व आहे, ह्याची कल्पना साऱ्यांनाच आहे. आमच्याजवळ पैसा नाहीं असेंही म्हटलें जाते. पण आमच्या सर्व योजना ह्या श्रीमंती योजना होत्या व आहेतही! त्या योजनाची यशस्विता पंडितजींच्याच शब्दांत मांडायची तर असे म्हणतां येईल कीं, "गेल्या सोळा वर्षांत श्रीमंत अधिक श्रीमंत झाले आणि गरीब अधिक गरीब झाले आहेत." योजनांवर पैसे खर्च करीत असतांना (खरं म्हणजे उधळीत असतांना) आम्हीं त्या योजनांचें संरक्षण करण्याची मूलभूत गरज मात्र गंभीरपणें विचारांत घेत नाहीं. फक्त आमच्या योजनांना पैसेही द्या आणि मग त्यांना संरक्षणही तुम्हींच द्या असें आम्हीं सुचवितो. ह्या पार्श्वभूमीवर दुर्गापूरचा ठराव तपासून पाहिला तर कांहींशी निराशाच पदरीं येते.

अन्नधान्यविषयक धोरणांवरही त्या अधिवेशनांत खूप टीका झाली. चौथी योजना आंखतांना त्यांत शेतीविषयक विचारांना अग्रहक्क देण्यांत यावा अशी सूचना करण्यांत आली. अर्थातच ही सूचना नवीन नव्हती व नाहीं कारण प्रत्येक योजनेमध्यें शेतीविषयक योजनेला अग्रहक्क देण्यांत आलेलाच होता. प्रश्न ठरावांचा नाहीं – त्याच्या अंमलबजावणीचा आहे. ठरावाबद्दलची जी कृति यापुढें होईल तिच्याकडे आमचें लक्ष राहील. कॉंग्रेसचे अध्यक्ष कामराज ह्यांच्या अध्यक्षीय भाषणांत त्यांनीं 'योजना'कारांना व सरकारला कांही धोक्याचे इशारे दिले. त्यांत त्यांनीं ३००० कोटी रुपयांचे जे 'लक्ष्य' आहे त्याबावत असें सांगितलें कीं, केंद्र सरकार वा राज्य सरकारें तें गांठूं शकतील असें आपणांस वाटत नाहीं. कर भरण्याची भारतीय जनतेची ताकद खूप ताणली गेली आहे. कॉंग्रेसमध्यें कॉंग्रेसचे अनेक टीकाकार निघाले. त्या साऱ्या टीकांतून एक फार मोठा व आशादायक भाग मला वाटतो तो असा कीं, पंडितजींच्या मृत्यूनंतर प्रथमच भरलेल्या ह्या अधिवेशनांत साऱ्यांना एक जाणीव झालेली दिसते ती अशी कीं, आतां नुसत्या घोषणा, ठराव, भाषणें ह्यावर जनता फसणार नाहीं. पंडितजींच्या व्यक्तित्वाच्या आडही आतां दडतां येणार नाहीं. आतां व्यावहारिक व वास्तववादी भूमिका पत्करूनच पुढील नेतृत्व कांहीं कार्य करूं शकेल. कॉंग्रेसच्या अधिवेशनाकडे आज फार मोठ्या अपेक्षेनें पाहिलें जात आहे असें दिसत नाहीं. कारण पंडितजी ही फार मोठी व्यक्ति (व शक्ति) निघून गेली आहे. पंडितजींची अनुपस्थिति साऱ्यांनाच जाणवली. शास्त्रीजींच्या कारकीर्दीत समस्यांनीं फार विक्राळ रूप धारण केलें आहे. आणि त्यांचा माणसाच्या दैनंदिन जीवनाशीं जवळचा संबंध दिसतो आहे. म्हणूनही नुसत्या 'श्रीमंती' अधिवेशनांनी व तेजस्वी ठरावांनीं सामान्य माणसाचें समाधान होत नाहीं!

**—सारस्वत**

### महत्त्वाची सूचना -

**लेखकांसाठीं : बऱ्याच लेखकांचें "दीपावली" कडे आलेलें व नापसंत ठरलेलें साहित्य आमच्याकडे कांहीं महिने पडून आहे. तें परत हवें असेल तर त्या लिखाणास पुरेसें पोस्टेज लेखकांनीं त्वरित पाठवावें म्हणजे तें त्यांच्या पत्त्यावर रवाना करतां येईल. पोस्टेज पाठविणाऱ्यांसच असें साहित्य परत करण्यांत येईल. अन्यथा तें तावडतोब निकालांत काढलें जाईल. त्यासंबंधीं पुनः कसलाहि पत्र-व्यवहार केला जाणार नाहीं. नापसंत कविता परत पाठविल्या जात नाहींत याची कृपया नोंद घ्यावी.**

**—संपादक**


स्वर गेला, शब्द राहिले !

(पान ८ वरून)

उभें राहून नृत्यमुद्रांनी तीं सरकवत केलेलें नृत्य पाहून आम्ही थक्क झालों. रोशन कुमारीच्या कथकानेंहि वृत्ति तादात्म्य केल्या; पण पद्मिनीचीं शालेय नृत्यें किरकोळ वाटलीं. रीटा देवींची बुद्धिमत्ता दिसली, साधना दिसली; पण नृत्य मनांत भरलें नाहीं. किरकोळ शरीरयष्टीमुळें गुणांचा प्रकाश पडला नाहीं.

मराठी भावगीतांनाहि एक रात्र देण्यात आली होती. ओहोहोहो! त्या दिवशीं कोण गर्दी ! जवळजवळ नऊ हजार लोक दाटीवाटीनें आणि मंडपाबाहेर उभे राहून, आधार मिळेल तिथें बसून ऐकत होते. पूर्णचंद्र त्या दिवशीं आकाशमाथ्यावर डौलानें मिरवत होता. आणि मधुन मधून येणाऱ्या चावऱ्या वाऱ्यांच्या झुळुका मराठी अंगनांच्या अंगावरील घट्ट लपेटलेल्या काश्मिरी शालींना स्पर्श करीत होत्या. दशरथ पुजारींचीं भावगीतें सुरेख जमलीं. लोकांना तीं अतिशय आवडल्याचें दिसलें. गजानन वाटव्यांबद्दल अपेक्षा होती. वाटवे या शाखेंतले युग निर्माते. भावगीतांत वाटव्यांचें घराणें आहे म्हटलें तरी चालेल. कांहीं अंशीं त्यांनीहि अपेक्षा पुरी केली: बाकीचे कलावंत आपापल्यापरी बरे गायले. ते विशेष आठवणींत राहिले नाहींत एवढेंच !

## हेंहि नसे थोडकें

सुरश्री केशरबाई व श्रीमती मोगूबाई या संगीतोत्सवांत एकाच बैठकीवर एकीमागून एक अशा गायल्या. बऱ्याच वर्षांत त्या अशा रीतीनें गायल्या नव्हत्या. अर्थातच संगीतांतील जाणकारांना ही एक पर्वणी वाटत होती. कांहीं लोकांना ही गोष्ट अशक्य वाटून त्यावर पैजाहि लागल्या होत्या; पण ही घटना घडलीच. मोगूबाईंचें गाणें आधीं होतें. त्यांचें गाणें संपलें तेव्हां आमच्यापैकीं एक जण हळूंच रंगमंचाआड जाऊन आला. त्याला वाटलें त्या दोघी तपोवृद्ध गायिका आतां एकमेकींना पाहातील. बऱ्याच दिवसांनी भेट होत असल्यानें एकमेकींना कडकडून भेटतील; निदान विचारपूस तरी करतील; त्या दोघींच्या भेटीचा फोटो काढायला त्यानें छायायंत्रहि बरोबर घेतलें होतें; पण कसचें काय आणि कसचें काय. . . . .मोगूबाईंचें गाणें संपलें तशा त्या रंगमंचाच्या डाव्या बाजूनें उतरल्या आणि घरीं निघून गेल्या आणि त्यानंतर दहा मिनिटांनी केशरबाई रंगमंचाच्या उजव्या बाजूनें बैठकीवर आल्या.

आमचा मित्र खजील झाला. कलावंतांत अशी 'पूर्व-पश्चिम' वृत्ति असते हें त्याला ठाऊक नव्हतें; परंतु केवळ कलावंतांतच नव्हे तर मराठी संपादकांत व साहित्यिकांतहि एकमेकांचें तोंड न पाहण्याच्या जाहीर कडव्या वृत्तीचीं वर्णनें करून आणि उदाहरणें देऊन आमच्या त्या भाबड्या मित्राचें आम्हांला सांत्वन करावें लागलें. एकाच बैठकीवर एकाच वेळीं त्यांचें गाणें ऐकायला मिळालें 'हेंहि नसे थोडकें' अशी त्याची समजूत आम्हांला घालावी लागली. असो !

एकंदरींत नऊ रात्रींत अत्यंत अल्प मोबदल्यांत आम्हांला आणि आमच्यासारख्या सर्वसामान्य मराठी रसिकांना अभिजात भारतीय संगीत-नृत्य कलेचे आणि तिच्या तपस्वी साधकांचें दुर्मिळ दर्शन घडलें. शांत चित्तानें व शिस्तीनें या यागाचें अवलोकन करीत योग्य जागीं दाद देऊन मराठी रसिकांनी आपली चोखंदळ तितकीच सहनशीलवृत्ति प्रगट करून हिंदुस्थानांतील कोणत्याहि प्रांतापेक्षां आमची रसिकता बुद्धिप्रामाण्यवादी आहे हें सिद्ध केलें. हिंदुस्थानभर फिरणारे हे कलावंतहि येथील बुद्धिमंत रसिकता पाहून संतुष्ट झाले.

## एक रास्त इच्छा

हें सर्व ज्या सरकारी करमणुक विभागानें घडवून आणलें व कोणताहि ढिलेपणा न करतां व्यवस्थितपणें तें पार पाडलें, त्या विभागांतील अधिकाऱ्यांना धन्यवाद दिले पाहिजेत. पुढील उत्सवांत आम्हांला ते खास महाराष्ट्रांतील संगीतांतील आजवरीच्या प्रगतीचें दर्शन घडवतील अशी आशा प्रगट करतों. महाराष्ट्रांत आज संगीतकारांच्या दोन पिढ्या वावरताहेत. या दोन्हीं पिढ्यांतील कलावंत गुणांनी थोर असून उत्तरेंतदेखील नांवाजलेले आहेत. महाराष्ट्रांतील संगीताची प्रगति म्हणजे अस्सल मराठी माणसांची संगीतांतील प्रगति असा आमच्या म्हणण्याचा अर्थ आहे. तसे अनेक प्रांतांतील संगीतकार आपल्या या महाराष्ट्रांत आहेत, नि त्यांचें इथें व्यवस्थित चाललेलें आहे; परंतु ज्या अभिजात संगीताला महाराष्ट्रांत विशेष स्थान नव्हतें त्याला एकदां आपलें म्हटल्यानंतर त्याची असीम जोपासना महाराष्ट्रानें केली आणि त्याला आपल्यांत सामावून घेतलें; समाजांतील सर्व थरांत त्याचा प्रचार करून त्याची वाढ केली; ती वाढ आज कोणत्या स्वरूपांत आहे याचें दर्शन घडावें, हा आमच्या म्हणण्याचा उद्देश आहे. यांत प्रांताभिमानाचा वा तत्सम कोणताहि अन्य हेतु नाहीं.

महाराष्ट्रांत आज नऊ रात्रीच नव्हे तर अठरा रात्री महोत्सव करावा इतके गायक-गायिका, वादक, नर्तक व नृत्यांगना आहेत. वयाचीं ऐंशीं वर्षे ओलांडलेले—वयोवृद्ध तपोवृद्ध आहेत; सत्तरींतले आहेत; साठींतले आहेत; पन्नाशींतले आहेत आणि पंचविशींतलेहि चांगलेच आहेत. आम्ही त्यांच्याबद्दल ऐकलेलें आहे व पाहिलेलें आहे. त्यांतील कांहीं संप्रदाय निर्माण करण्याइतके मोठे झालेले आहेत. संगीतोत्सवाची पुन्हां मुंबईंत पाळी येईल तेव्हां याचा जरूर विचार व्हावा.

—श्रीरंग

(पान १० वरून)

आमचें वाहन धांवत होतें– चुशूलच्या परिसरांतून धांवत होतें. रणभूमि ! होय, रणभूमि म्हणतात ती हीच होती. हीच ती चुशूलची विख्यात रणभूमि. भूमीसारखी भूमि इतस्तत: पसरली होती. जशी अन्य भूमि तशीच ही भूमि. मला आपले उगाच वाटत होते कीं तेथें मला एक रेघ ओढलेली दिसेल. पलीकडचा भाग शत्रूचा व अलिकडचा आपला. कुठें मला हाडाचे सांपळे दिसतील, उडालेलीं मस्तकें दिसतील, गोळ्यांची कवचे दिसतील, रक्तानें ओलींचिंब झालेलीं भुदं, मोडकी हत्यारें, मेलेले घोडे, असें कांहीं दिसेल. पण मला तसें कांहींच दिसले नाहीं. लढाई आतां शिळी होऊन गेली होती. युद्धाच्या खुणा पुसल्या होत्या. एकदां मी भाबडेपणानें मैत्रांना विचारले, "शत्रू शेजारींच आहे म्हणतां ना ? कुठें आहे शत्रू ?" "त्या टेकडीवरुन शत्रू ह्या क्षणीं कदाचित् आपणांकडे पहात असेल." मैत्रांनीं एका टेकडीकडे बोट दाखवीत उत्तर दिले. त्यावर मी म्हणालो, "आपण जाऊं या कीं त्या टेकडीपाशीं ?" "पेकिंगला चलायचे असेल तर जाऊं या !" मैत्रांनीं हंसून उत्तर दिले. क्षणभर मला त्या कल्पनेचा सुद्धां मोह पडला. कैदी म्हणून पेकिंगला जायचे. लाल चीन आंतून पहायचा. एरवीं पेकिंगला जातो कोण ? पेकिंगचे दूत त्या तिथें समोरच होते– अगदीं जवळ – त्या समोरच्या टेकडीवर. मला तें खरेंच वाटेना. आमच्या भूमीचा लचका त्यांनीं तोडला आणि अद्याप तिथेंच ते होते. कदाचित् दुर्बिणी लावून आमच्याकडे पहातहि असतील. आणि आम्ही ह्या येथें होतों. आम्हांला ते दिसत नव्हते. पण त्यांनी आमचा भूभाग ग्रासून टाकला होता. येथेंच त्यांचा प्रखर प्रतिकार आपल्या सैनिकांनीं केला. ही सारी युद्धभूमीच होती. हें रणांगण होतं. आणि हें रणांगण होते, ह्याची साक्ष आतां आम्ही पहात होतों. एका विस्तीर्ण कुंपणाशेजारीं आम्हीं थांवलों होतों–आमचे वाहन थांवलें होतें. फाटक ओलांडून आम्ही आंत गेलों. दोन ओळींत दगडांच्या सव्वीस राशी तेथें आम्ही पाहिल्या. गुरखा पलटणींतील सव्वीस वीरांच्या चिता येथें रचल्या गेल्या. येथें हे वीर धारातीर्थीं पडले व त्यांचें दहन झालें. 'थापा' 'गुरंग' ह्यासारखीं त्यांचीं नांवें होती. ती नांवें तेथें लिहिलेलीं होतीं. देशासाठीं ते मेले आणि येथेंच त्यांच्या चिता पेटल्या – सव्वीस चिता. त्या चितांचे कोळसे अद्यापहिं तेथें विखुरलेले होते. अग्नि वर्फांत विझल्यासारखा दिसत होता. पण कोळशांच्या पोटांत अग्नि होताच. पुन्हां ठिणगी पडण्याची वाट होती. कोळसे त्या ठिणगीची प्रतीक्षा करीतच होते. म्हणून तर ते तेथें ह्या वर्फांत तपश्चर्या करीत होते, अग्नि जोपासत होते. ती राख नव्हती, कोळसे होते – गुरख्यांच्या चितेंतले कोळसे. मी दोन–चार कोळसे उचलले व खिशांत टाकले. गुरंग व थापा ! काय त्यांचा माझा संबंध ? कुठले नेपाळांतले ते, कुठला महाराष्ट्रांतला मी ! कधीं कुणी कुणाला पाहिलेंहि नव्हते. संबंध आला तो असा. ते वीर कर्तव्य करीत असतां गेल्यावर त्यांचे कोळसे माझ्या हातीं आले. हे कोळसे माझे होते. ते माझ्या हातींच यावयाचे होते. योग हा असाच होता. माझीच वाट पहात महिनेच्या महिने ते चार कोळसे तेथें पडून होते. ते कोळसे

माझ्यापाशीं कांहीं मागत होते. माझें आणि त्या कोळशांचें कांहीं नातें होतें म्हणून तर ते कोळसे मी उचलले! म्हणून तर आमची वाट पहात ते तेथें बसले! आम्हांला ऋण फेडायचे होतें, ऐन उमेदींत देशासाठीं त्यांचा कोळसा झाला. त्याचें ऋण आम्हांला फेडायचें होतें. अद्याप शत्रू आमच्या छातीवर पाय रोवून उभा होता. तो हटला नव्हता, सीमेपार गेला नव्हता — त्या तिथें तो होता — त्या पलिकडच्या टेकडीवर. आणि येथें ह्या सव्वीस समाधी होत्या. सव्वीस वीरांचे कोळसे ह्या येथें पसरले होते. त्यांच्या वीरोचित उत्तर-क्रिया अद्याप करणें होतें, अंगार जागविणे होते, अंगार फुलविणे होते, आक्रमक व आक्रमण अद्याप धुळीस मिळविणें होतें. तें उत्तरदायित्व आमचें होतें. जे जिवंत होते, त्यांचे होते. जे मेले त्यांस तृप्ति मिळेल, सद्गति मिळेल असें अद्याप कांहीं आम्हांस करणें होतें....करणें होतें.

ते चार कोळसे मी मुठींत घट्ट धरले व चोहों दिशांस पाहिलें. ओसाड, दगड-गोटयांनीं भरलेला, पर्वतमय बर्फाळ प्रदेश! अमर्याद शांतता. त्या शांततेच्या फसव्या पांघरुणांत दडून बसलेला पिवळा समंध. उत्तर दिशेस अस्ताव्यस्त पसरलेला—पसरूं इच्छिणारा पसरत जाणारा! ज्यानें हे सव्वीस बळी घेतले त्यांचे कोळसे माझ्या मुठींत होते. हे कोळसे शिलगावणें होते, हें वाण वाटणें होते—कलंक पुसून जाईपर्यंत, पशुता भस्मीभूत होईपर्यंत. तरच ते मुक्त होतील व आम्ही मुक्त होऊं! अन्यथा शांति त्यांच्या आत्म्यांना नाहीं, शांति आमच्या आत्म्यांना नाहीं! असेच कांहीं विचार करीत त्या दहनभूमीवर फिरलो. फिरलो आणि त्या विजनवासी सैनिकांस वंदना देऊन पुढें झालो — एका नव्या स्मारकापाशीं. हें स्मारक वीर अहिरांचें होतें. कुमाऊ पलटणींतील एकशें चौदा हुत वीरांचें हें स्मारक होतें. समोर "रेझिंग-ला" (ला—खिंड) दिसत होती. त्याच खिंडींत सैतानसिंगाच्या नेतृत्वाखालीं हे सैनिक झुंजले, लढतां लढतां पडले. डोंगर माथ्यावर शत्रूचे मोर्चे होते. उतरणीवर सैतानसिंग गाडून उभा होता. तेथें त्याचे मोर्चे होते. फार विषम अवस्थेंत सैतानसिंग येथें लढला. लढला आणि लढतां लढतां पडला. एकशें चौदा जवानांनीं त्याच्या समवेत जिवाची होड लावली. ते सारे येथें पडले. देवतुल्य पराक्रम करणाऱ्या सैतानसिंगाचें प्रेत दोन दिवसांनंतर एका डोंगर घळींत सांपडलें. अभूतपूर्व प्रतिकाराचें तें वीरकृत्य येथें घडलें. हें त्या वीरकृत्याचें स्मारक होतें. वीर अहिरांचें दहन येथें झालें होते. त्या दहन-भूमीवर लावलेलीं हिरवी रोपटीं झगडत होतीं व जगत होतीं. मुळां-भोंवतीं सांचलेल्या पाण्यावर बर्फाची पांढरी साय जमली होती — अर्धें बर्फ, अर्धें पाणी! तरीहि त्यांचे हिरवें चैतन्य गोठलें नव्हतें—लोपलें नव्हतें. हा गुण ह्या भूमीचा होता, येथील परंपरेचा होता, संस्कृतीचा होता. त्या संस्कृतीचा प्राण अजर होता, अमर होता. तेंच कौतुक स्मारकाच्या प्रवेशद्वारापाशीं आम्ही पाहिलें. तेथें पिंपळ-पानावरील तांब्यां कृष्णाचें एक चित्र होतें. चित्र होतें एका अहिर सैनिकाचें, की जें त्यानें खिशांत आपल्या हृदयाशीं बाळगलें होतें. जवान धारातीर्थी पडला, त्याची राख झाली. पण कृष्णाचें तें चित्र आग पिऊन, पचवून उरलें. चरण स्पर्शानें यमुनेचें उसळतें पाणी हटलें, तसा अग्नि हटला. चित्र सुरक्षित राहिलें व येथें लागलें. कृष्ण त्यांची सोबत करीत होता — त्या एकशें चौदा अहिर वीरांची, त्या सव्वीस गुरखा सैनिकांची! त्या ओसाडींत दुसरे कोणी नव्हते. ते होते व त्यांचा कृष्ण होता! द्रौपदीचा सखा कृष्ण! पार्थाला प्रेरणा देणारा कृष्ण! प्रकाशमय कृष्ण! ज्ञानमय कृष्ण! आनंदमय कृष्ण! "न मे कर्मफले स्पृहः!" म्हणून घनगंभीर स्वरांत गरजणारा कृष्ण! भारताचा भाग्यविधाता, स्फूर्ति-दाता, रक्षणकर्ता भगवान् श्रीकृष्ण! तो कृष्ण त्या तेथें मी पाहिला व माझें हृदय फुललें, भारावलें आणि मस्तक नम्र झालें. मदांध कंसाला त्याच्या सत्तासिंहासनावरून खालीं ओढणारा, कालियाचें मर्दन करणारा, पीडा-ग्रस्तावर गोवर्धनाचें कृपाछत्र धरणारा कृष्ण देशाच्या दूरस्त सीमेवर पहुडलेल्या अहिर-वीरांची सोबत करीत होता. जोंवर या देशांत कृष्ण होता, कृष्णभक्त होते, कृष्णाचें स्मरण होतें, संदेश होता तोंवर ह्या देशांत भविष्य-काळ होता, आशा होती — विजयाची आशा होती, वैभवाची आशा होती, देवतुल्य कृतीची व पराक्रमी अस्तित्वाची आशा होती. त्या कृष्ण दर्शनानें हेंच मला सांगितलें. त्या सुप्त समर-भूमीवरील योगेश्वर कृष्णाचें प्रसन्न बालरूप आम्ही हृदय संपुटांत सामावून घेतलें व मार्गस्थ झालों. ते अहिर वीर मागें राहिले. ते गुरख तेथेंच राहिले. त्या सीमाशून्य एकांतांत ते राहिले व आमचा प्रवास सुरूं झाला. नव्या छावणीच्या दिशेनें आम्ही जात होतो. स्वयं-प्रेरिकेचीं चाकें आदळत होतीं व फिरत होती आमचीं तोंडें बोलत होतीं. दृश्यें पालटत होती दूर एक हिरवागार डोंगर दिसूं लागला. त्य हिरवेपणाचें मला आश्चर्य वाटलें. मी मैत्रे महाशयांना विचारले, "तो डोंगर इतका हिरवा कसा? तेथें गवत उगवलें आहे काय कीं हिरव्या दगडांचाच तो डोंगर आहे?' "It is an Optical illusion!" मैत्र महाशयांनी उत्तर दिलें. "तो दृष्टीभ्रम आहे गवत वगैरे तेथें कांहीं नाहीं!"

तेथें गवत नव्हते. पण तो डोंगर हिरव्य दगडांचा होता. जवळ जातांच आमच्या तें ध्यानांत आले. अनेक रंगीत दगडांचे डोंगर









तेथें उभे होते. हिरवट, पिंगट, गुलाबी, राखरंगी ! कल्पना करा इतक्या वेगवेगळ्या रंगांचे डोंगर शेजारीं उभे झाले, परस्परांत मिसळून गेले, तर तें दृश्य कसें दिसेल ! असें वाटत होते कीं हे डोंगर नव्हेत तर अनेक रंगांची प्रचंड दगडीं फुलें ह्या येथें फुललीं आहेत– कोरली गेली आहेत. गुलाबी डोंगर, हिरवा डोंगर, पिंगट डोंगर, पिवळा डोंगर ! यक्ष-भूमींत शोभावे असे तें अद्भुत दृश्य होतें. राक्षसकाय दगडांनीं उभे केलेले असेच विस्मय-जनक दृश्य मी भावनगरहून वारंगळला जातांना पाहिले होते. दहा मजली घराच्या आकारांचे शतावधी काळे अस्तर तेथें मी आकाश रेषेपर्यंत विखुरलेले पाहिले होते. भोनगीरचा किल्ला तर एकसंघ भासणाऱ्या केवळ दोन अवाढव्य शिलांचा बनलेला होता. दगड म्हणजे वस्तू ती काय ? पण विलक्षण रंगांचे व वेगवेगळ्या आकारांचे केवळ दगड कांहीं एका पद्धतीनें एकत्र आले तर केवढें दम कोडणारे सौंदर्य उत्पन्न करूं शकतात ह्याचा नवा अनुभव आज मी घेत होतो. येथें फुलें नव्हती, झाडें नव्हती, हिरवळ नव्हती, होते केवळ बहुरंगी पाषाणांचे ढीग; पण त्या पाषाणांनींच येथें सौंदर्याची एक विराट सृष्टि उत्पन्न केली होती. परमेश्वरी निर्मितीचा तो एक चमत्कार होता. दगडांतील देवाचा तो मूर्तिमंत साक्षात्कार होता आणि दुसरा साक्षात्कार होता सिंधू जलाचा ! तिचा प्रवाह आमच्या डाव्या अंगानें सारखा वहात होता. डोळे भरून मी सिंधूच्या त्या धांवत्या पाण्याकडे पहात होतो. सहस्रावधि वर्षें ही सिंधू येथून अशीच वहात आली होती. सहस्रावधि पिढ्या तिनें पाहिल्या होत्या. असंख्य माणसें पाहिली होती. त्यांचें सुख-दुःख पाहिले होते. त्यांच्या वेदना पाहिल्या होत्या. आपल्या पुण्यपावन स्पर्शानें त्या वेदना तिनें शांत केल्या होत्या. तिच्या जलानें प्रेरणा दिल्या होत्या, सांत्वना दिल्या होत्या. तीच ही सिंधू होती. अद्याप सिंधू आमची होती, आमच्यांत होती. तिचा मूळप्रवाह आमच्या-पाशीं होता, आमच्या अस्तित्वाच्या मूळ प्रवाहाशीं तो गुंतून गेला होता. सिंधूपासून आम्हांला वेगळे काढणें शक्य नव्हते, व आपच्यापासूनहि ती सुरनदी वेगळी निघाली नसती. तिनें अद्याप आम्हांला अंतराय दिला नव्हता. ती आम्हांला अंतराय देणार नव्हती. पिढ्यान् पिढ्या आमचा जीवन-प्रवाह सुफलित करीत तिचा जीवन-प्रवाह वाहत होता. हें आणि तें जीवन एकसंघ होतें. एकरूप होतें. देवानेंच ज्यांना जोडले, त्यांना कोण तोडणार होते ? सिंधूच्या प्रवाहा-बरोबर सागरापर्यंत माझें मन धांव घेत होते व पुन्हां पुन्हां तिच्या मूळापर्यंत परत येत होते. तिचें तें बालरूप मी निरखून पहात होतो. मला तिच्या पाण्याला स्पर्श करावयाचा होता. त्या स्पर्शासमवेतच मला आमच्या अजर, अमर व अखंड परंपरेला स्पर्श करावयाचा होता. मनांत तेवणारी ज्योत पाजळून घ्यावयाची होती. इतिहासाशीं व इतिहासदत्त कर्तव्याशीं नव्यानें नाते जोडावयाचे होते. पापपीडा असेल, तोवर तिच्या जलाचें सिंचन करावयाचें होते. सिंधू स्पर्शासाठीं पुन्हां एकदां मी उतावीळ झालो होतो. माझी उताविळी शिगेला पोहोंचली व आमचें वाहन थांबले. चुमितांग झऱ्यापाशीं आम्ही थांबलों होतों. हा गरम पाण्याचा झरा सिंधूला अगदीं खेटूनच आहे. तिच्या अगदीं पात्रांतच आहे. सिंधूला पूर येत असेल तेंव्हां हा झरा पूराच्या पाण्यांत पूर्णपणें बुडून जात असेल. असे अनेक पूर ह्या झऱ्यानें पाहिले. तरी झरा आहे तसाच आहे. कडकडीत पाण्याचा हा झरा आहे. तें गरम पाणी हाताला सोसत नाहीं, जसें सिंधूचें तें गार पाणी हाताला सोसत नाही. जीप उंचावर उभी होती. तेथून तोल संभाळत झऱ्यापर्यंत आम्ही चालत गेलो. स्नानासाठीं तेथे पक्का आडोसा आहे–स्नानघर आहे. स्नानें कोणी केली नाहींत. केवळ गरम पाण्यानें हातपाय तोंड तेवढे धुतले. नंतर माझे सोबती वाहनाच्या दिशेनें परत फिरले. मी सिंधू प्रवाहाच्या दिशेनें चालू लागलो. तो प्रवाह फारसा दूर नव्हता. फार तर दोन सहस्र हात दूर असेल. खडकांतून व पाण्याच्या डबक्यांतून तेथवर जावयाचे होते. तें काम थोडेसें कष्टप्रद होते. पण येथवर आल्यावर सिंधूजलाला स्पर्श न करणें मला केवळ करंटेपणाचें वाटले. हळुहळू मी चालत राहिलो व सिंधूच्या प्रवाहाशीं जाऊन उभा राहिलो. त्या पाण्यानें मी मार्जन केले व वेगानें धांवणाऱ्या त्या प्रवाहाकडे पहात राहिलो. पाहतां पाहतां माझे डोळे मिटले. माझ्या ओंजळींत सिंधूचें पाणी होते. तें तीर्थ मी प्राशन केले. माझें मन सिंधूची प्रार्थना करूं लागले. सिंधूचीं रूपें आठवूं लागलें. सिंधूचा इतिहास आठवूं लागलो. सिंधूचा इतिहास हा आमचाच इतिहास होता. सिंधूनें आम्हांला आमचें स्वत्व दिले. तिनें आमचे पोषण केले. छायेंतून व प्रकाशांतून तिनें आम्हांला जातांना पाहिले, घसरतांना पाहिले व सावरतांना पाहिले. सुर-असुरांच्या अनेक तुंबळ संग्रामांना ती साक्षीभूत होती. सुर वृत्तीच्या अंतिम विजयाचें अभिवचन तिनें आम्हांला दिले. मृत्युंजय पूर्वजांचे अमर पराक्रम तिनें पाहिले. ग्रीस गेला व रोम गेले, खाल्डिया गेला व कार्थेज गेले. जिनेव्ह व पर्सीपोलिस नष्ट झाले. परंतु सिंधूचीं बालकें नष्ट झालीं नाहींत. आपली अखंड परंपरा घेऊन ती जीवित राहिली. मथुरा जीवित राहिली व काशी जीवित राहिली. दिल्ली जीवित राहिली व उज्जयिनी जीवित राहिली. आमच्या भाग्यसूर्यावर अनेकानेक अभ्र आले व पांगले. आज अभ्र पुन्हा आले होते. प्रकाशाला अंधेर ग्रासूं पहात होता. जे मांडले ते पोखरले जात होते, मोडूं पहात होते. परंतु जे मोडले ते आम्ही मांडणार होतो. जसे ते पूर्वी होते, तसेच ते पुनश्च करणार होतो. आम्ही बालकें सिंधूचीं होतो. तिजपाशीं आम्ही पराक्रमाचे वरदान मागत होतो. चारित्र्याचे वरदान मागत होतो. कीं जें वरदान तिनें आमच्या पुण्यश्लोक पूर्वजांस दिले. पुन्हां एकदां मागणें तेच होते. अंधकाराचा नाश व्हावा, असुरवृत्तीचा नाश व्हावा, आक्रमकांचा नाश व्हावा. पापाचा नाश व्हावा, पुण्यानें पापास जिकावें ! धर्मानें अधर्मास जिंकावे ! सिंधुपुत्रांनीं सिंधू-शत्रूंस पराभूत करावें ! हिच्या तटावर विजयाचे यज्ञ वन्ही पुन्हा चेतावेत. जसे ते पूर्वापार चेतले, व चेतत आले !

सिंधू जलांत उभे राहून मी अनेक संकल्प सोडले व इच्छा केल्या. माणसानें निदान इच्छा कराव्यात. इच्छाच गेली म्हणजे सारेंच संपले. आकांक्षा बाळगाव्यात, प्रयत्न करावेत व आशीर्वाद मागावेत. तसे आशीर्वाद मी सिंधूचे मागितले. सिंधु तटावर ज्यांचे देह पडले त्या पुण्यात्म्यांचे आशीर्वाद मागितले व सिंधु तीर्थानें पावन होऊन बाहेर पडलो.

**(क्रमशः)**

( पृष्ठ ७ वरून )

पिंगळेयांजवळ असलेला दारुगोळा तपासल्यावर सरकारी अधिकारी म्हणाले होते–

'It was sufficient to annihilate half regiment.'

पिंगळ्यांच्या अटकेनंतर गदर संस्थेचे ८१ बंडखोर पकडले गेले. त्यापैकीं रक्तपिऊ वकासुरी सरकारनें २३ तरुणांना फांशी व ४० बंडखोरांना जन्मठेप ठोठावली.

पिंगळ्यांना फांशीची शिक्षा जाहीर होतांच ते न्यायालयांतच ताडकन् सफाईदार इंग्रजींत उद्‌गारले–

"So, that's all ! बस्‌ ! इतकंच ?"

पिंगळ्यांची मिळकत जप्त करण्यासाठीं त्याच संध्याकाळीं पोलीस त्यांच्या तळेगांवच्या रहात्या घरांत गेले. आणि दारची गाई वासरें हंबरत आहेत, रात्रीच्या भोजनाची सोय नाहीं अशा स्थितींत त्यानीं पिंगळ्यांच्या म्हाताऱ्या मातोश्रींना व इतरांना घराबाहेर काढून लावलें.

मंगळवार दिनांक १६ नोव्हेंबर १९१५ ला विष्णूपंतांना फांशी देण्याचें ठरलें होतें. त्याच्या आदल्या दिवशीं एक अधिकारी त्यांना म्हणाला, आम्ही तुम्हांला शक्य तितका अधिक काळ जिवंत ठेवलं. त्यावर पिंगळे उत्तरले "तुम्ही चुकलांत. तुम्ही माझ्यावर अन्याय केला. कारण त्यामुळें माझ्या पूर्वीच्या हुतात्म्यांना हा आपली सोबत सोडतो कीं काय असें वाटून त्यांचा माझ्यावरील विश्वास डळमळला असेल. दुसरे म्हणजे मी आधींच जाऊन स्वर्गात माझ्या दुसऱ्या मित्रांची व्यवस्था केली असती. या गोष्टीलाही मी अंतरलों."

ह्या पुढील काळांत क्रांतिकारकांच्या संघटना शतपट जोमानें वाढल्या. चोहींकडे विजा चमकूं लागल्या. रक्ताचा पाऊस पडूं लागला. क्रांति करण्यासाठी वासुदेव बळवंतांना १९ व्या शतकांत जो मार्ग पत्करवा लागला तोच पुन्हां एका दलानें अमलांत आणला. प्रवास, बाँबनिर्मिती-साठी जबर खर्च बसतो सरकारी खजिना लुटून तो खर्च पूरा करण्याचें महान क्रांतिकारी श्री शचीन्द्रनाथ सान्याल ह्यांनी ठरविलें.

कट रचला गेला. ९ ऑगस्ट १९२५ च्या रात्रीं फक्त दहा क्रांति-कारकांनी सांखळी खेचून काकोरी स्टेशन येण्यापूर्वीच काम फत्ते केलं. हे दहा क्रांतिकारक म्हणजे सर्वश्री रामप्रसाद (प्रमुख), अशफाकउल्ला खान, राजेन्द्रनाथ लाहिडी, चंद्रशेखर आझाद, शचीन्द्रनाथ बक्षी, मुकुन्दीलाल, केशव चक्रवर्ती, मुरारीलाल, बनवारीलाल आणि मन्मथ-नाथ गुप्त.

परंतु सूर्याजी पिसाळाची निमकहराम अवलाद पुन्हां आडवी आली. कटांत सामील असलेला बनवारीलाल सरकारी जोडे चाटायला तयार झाला. श्री शचीन सान्यालांच्या संघटनेंतील सर्व वीरांची नामावलि सरकारला मिळाली. शाहजहांपूर, कानपूर, बनारस, अलाहाबाद, वगैरे शहरांमधून जवळ जवळ ५० क्रांतिवीरांना अटक झाली. बनारसीलाल नांवाचा आणखी एक घरभेद्या सरकारला सहाय्यक ठरला.

काकोरी कटाचा खटला फारच चिघळला. पंडित जगत नारायण मुल्ला नांवाचे वकील ५०० रुपये रोज घेऊन सरकारतर्फे आपल्याच भावांना गुन्हेगार ठरविण्यासाठीं घसाफोड करीत होते. परंतु क्रांति-कारकांचा पक्ष राखण्यासाठीं श्री मोतीलाल नेहरू ह्यांच्या नेतृत्वाखालीं एक समिती तयार करण्यांत आली. ह्या राष्ट्रीय समितीमध्यें सर्वश्री जवाहरलाल नेहरू, गणेशशंकर विद्यार्थी, शिवप्रसाद गुप्त, श्री प्रकाश व आचार्य नरेंद्र देवांसारखी वडी मंडळी होतीं. मुख्य वकील म्हणून कलकत्याचे बॅरिस्टर बी. एम. चौधरी काम पहात होते. शिवाय सर्वश्री गोविंदवल्लभ पंत, चंद्रभानू गुप्त, आर. एफ. बहादुर, मोहनलाल सक्सेना इत्यादि प्रसिद्ध वकील बॅरिस्टर चौधरींच्या दिमतीला होते. ह्या महान नेत्यांनी आणि वकिलांनी जिवाची शर्थ केली पण ती न्याय-देवता आंधळी असून तिरव्या डोळ्यांची होती. तिला पुढ्यातलं सत्य सुद्धां तिरपं दिसत होतं. १८ महिने केस चालली अन् शेवटी निकाल काय ? तर पंडीत रामप्रसाद, राजेंद्र लाहिडी, रोशनसिंग व अशफाक-ऊल्ला खान ह्यांना फांशी, शचीन्द्रनाथ सान्यालांना काळं पाणी आणि इतरांना १४–१४ व २०–२० वर्षांच्या शिक्षा ठोठावण्यांत आल्या. आणि फितुर बनवारीलालला '५ वर्ष कैद' हें इनाम देण्यांत आलं.

काकोरी कटाचं वारंट निघूनहि एक सिंह पार सटकला होता. पोलीसांनीं त्याला जिवंतपणें जाळ्यांत अडकविण्यासाठीं पुढें कित्येक वर्षेपर्यंत धडपड केली. पण जेलखाना आणि कोर्ट ह्यामध्ये कधीहि पाऊल न टाकता हा वीर शिरोमणी पोलीसांशी युद्ध करतां करतां धारातीर्थी पडला. सरदार भगतसिंग इत्यादि अनेक विजेचीं बीजं ज्यानें पेरली असा हा काकोरी कटातील फरारी क्रांतिकेसरी म्हणजे चंद्र-शेखर आझाद.

काकोरी कटांत ज्या ४ वीरांना फांशीची शिक्षा जाहीर झाली त्यापैकी राजेन्द्र लाहिडीला १७ डिसेंबर, १९२७ ला फांशी देण्याचं ठरलं होतं. निकाल लागल्यावर सर्व क्रांतिवीर निरनिराळ्या जेलखान्यांमध्यें पाठविले जाणार होते. त्यावेळीं दीर्घ कारावास भोगण्यास जाणाऱ्या मित्रांची रजा घेतांना कोमल व हंसतमुख लाहिडी म्हणाले –

"मेरी तो थोडे दिनों की तकलीफ है, महीने २ महीनेमें खत्म हो जायगी, पर मुझे तुम लोगोंकी चिन्ता है जिन्हें चौदह-चौदह और बीस-बीस सालतक जेलमें सडना है !"

काय विलक्षण चिंता ही ! गुलामींत खितपत पडण्यापेक्षां जीवनाचा अंत करून स्वातंत्र्याची प्यास शमविणाऱ्या लाहिडींचा शब्द अन् सरदार भगतसिंगानीं न्यायालयांत उच्चारलेले "क्यों की जिंदगी और आझादी एक बात है, गुलामी और मौत एक बात है" हे शब्द, आणि मी तर म्हणतो संपूर्ण क्रांतिलढ्यांत सरकारच्या कानठळ्या बसाव्यात असे क्रांतिवीरांचे सिंहनाद जणुं एकाच व्यक्तीचे असावेत असं वाटतं.

नवादा गांवातील ठाकुर रोशनसिंग फांशीची शिक्षा जाहीर झाल्या-पासून ॐ हा एकाक्षरी मंत्रजप करीत होते. मरणापूर्वी लिहिलेल्या एका पत्रांत ते म्हणतात,

**"जिन्दगी जिंदादिली को जान ऐ रोशन**
**वरना कितने मरे और पैदा होते जाते हैं."**

तिसरे हुतात्मा अशफाकउल्ला खान शायरी करीत. मुसलमान असल्यामुळें त्यांना त्यांच्या हिंदु दोस्तांविरुद्ध साक्ष देण्यास वश करण्याचा खूप प्रयत्न सरकारनें मुस्लिम पोलीस अधिकाऱ्यांतर्फे करविला. रोज रोज जेव्हां पोलीस अधिकारी त्यांना हिंदूंविरुद्ध भडकवूं

(पृष्ठ ६७ वर पहा)














सुप्रसिद्ध तारका ऑड्रे हेप्बर्न 'एलिझा'च्या भूमिकेंत

# माय फेअर लेडी !

**बर्नार्ड** शॉं या प्रसिद्ध नाटककाराच्या 'पिग्मॅलिअन' या गाजलेल्या अमर अशा नाटकावर आधारित असें 'माय फेअर लेडी' हें सप्तरंगी चित्र नव्हे एक अपूर्व गानपट मुंबईस चार फेब्रुवारीला मोठ्या दिमाखानें रुजूं होत आहे !

वॉर्नर ब्रदर्स या आघाडीवरच्या चित्रसंस्थेनें मोठ्या धाडसानें सुमारें पावणे दोन कोटी डॉलर्स भांडवल खर्ची घालून हा चित्रपट तयार केला आहे. नेहमींची चित्रें 'स्टॅंडर्ड साईझ,' म्हणजे ३५ एम्. एम्. असतात तर हें चित्र सुपर पॅनव्हिजन ७० एम्. एम्. म्हणजे दुप्पट आकाराचें आहे ! तें दाखविण्यासाठीं खास यंत्रसामुग्री बसविण्याचें काम इरॉस या आलीशान चित्रगृहांत सध्यां सुरूं आहे. हा चित्रपट 'सिक्स ट्रॅक्स स्टिरीओस्कोपिक' आहे. म्हणजे पडद्यावरील पात्रें संवाद म्हणत असतांना त्या पात्रांच्या दिशेनेंच आपणांस आवाज वेगवेगळ्या सहा ठिकाणांहून ऐकूं येईल. म्हणजे जणुं काय आपण प्रत्यक्षच रंगभूमीवर ही कलाकृति पहात आहोंत असा आभास निर्माण होईल.

मूळचें पिग्मॅलिअन हें शॉं साहेबांचे नाटक अगोदरच रंगभूमीवर अमाप यश मिळवून गेले. या गद्य नाटकाचें रुपांतर संगीत नाटकांत करण्यांत येऊन त्याचें नांव 'माय फेअर लेडी' असें ठेवण्यांत आलें. हें संगीत रुपांतर न्यूयॉर्कच्या रंगमंचावर सतत साडेसहा वर्षें 'हाऊस फुल्ल' गर्दींत चालूं होतें. या प्रदीर्घ अशा कारकिर्दींत त्याचे २७१७ प्रयोग झाले. लंडन येथील नाट्यगृहांतहि या संगीत नाटकाचे प्रयोग पांच वर्षें होत होते आणि प्रयोगाचा आंकडा २०९० वा गांठला गेला तरी गर्दी कमी होईना.

पंचावन्न लक्षाच्या मोबदल्यानंतर या नाटकाचे चित्रपटविषयक हक्क वॉर्नर साहेबानें मिळविलें. या नंतरच्या खर्चाचे आंकडे पहातांना छाती दडपून जाते. नृत्य समारंभांतील स्त्री पुरुष कलावंतांच्या पोषाखासाठीं पांच लक्ष डॉलर्स लागले. स्टुडीओच्या आवारांत उभें करण्यांत आलेल्या दृश्यांचाच खर्च दहा लक्ष डॉलर्स इतका आला. असो.

या चित्रपटांतील नायकाची भूमिका रेक्स हॅरीसन या रंगभूमीवरील आणि चित्रपटसृष्टीमधील नांवाजलेल्या चित्रताऱ्यानें केली आहे. त्याची प्रोफेसर "हिगिन्स' ही भूमिका त्याने रंगभूमीवर शेंकडों वेळां यशस्वी रितीनें करून दाखविली आहे. परंतु चित्रिकरणासाठीं म्हणून त्यानें ही भूमिका आणखी कांहीं तरी वेगळ्यां स्वरुपांत साकार करून दाखविली. सुप्रसिद्ध चित्रतारका ऑड्रे हेपबर्न हिनें चित्रपटाची नायिका 'एलिझा' मूर्त स्वरूपांत उभी केली आहे. ही भूमिका करणें खरोखर कठीण आहे. कारण एलिझा ही एक अडाणी गलिच्छ आणि फाटक्या तुटक्या कपड्यांतील फुलें विकणारी मुलगी असते. प्रोफेसर हिगिन्स पैजेचा विडा उचलून या मुलीचें रुपांतर सुविद्य सुसंस्कृत आणि मनोहर वेषांतल्या सरदारकन्येंत करितो ! या वेगवेगळ्या टोंकांच्या तरुणी साकार करतांना ऑड्रे हेपबर्ननें आपली सारी कला-साधना परिश्रमपूर्वक खर्ची घातली आहे. नायक नायिकेच्या या भूमिका प्रेक्षकांच्या अन्तःकरणास चटका लावून सोडतात यांत कांहीं संशय नाहीं !

अशा या अपूर्व चित्राची रुजवातसुद्धां अगदीं अपूर्व अशा पद्धतीनें करण्यांत आली आहे. पहिले दहा दिवस रात्रींचा खेळ हा धर्मार्थ खेळ म्हणुन जाहीर झाला आहे. मुंबापुरींतल्या अनेक लोकोपयुक्त अशा संस्थांना या योजनेनुसार सुमारें दश लक्ष रुपयांची रोकडी मदत मिळणार आहे. चित्रप्रकाशनाच्या इतिहासांत या धर्मार्थ योजनेला आतांपर्यंत तोड नाहीं !



या चित्रांतील एक चटका लावणारा प्रसंग

# मराठी रंगभूमि दर्शन

**आमची** मराठी रंगभूमि! आपणांस तिचा केव्हडा अभिमान वाटतो! तिचा मंगल आणि संपन्न असा विस्तार केवळ महाराष्ट्रांतच नव्हे तर दक्षिणेस तंजावरपर्यंत पोहोंचलेला. तिचें व्यापक असें कार्य-क्षेत्रहि महाराष्ट्राबाहेर दूर कलकत्ता आणि दिल्लीपर्यंत पसरलेलें आहे! राजाश्रयानें सुरवात झालेल्या मराठी रंगभूमीनें लोकाश्रयावर पुढें एक वैभवशाली परंपरा निर्माण केली. इतकेंच नव्हे तर इतिहासाचें एक तेजस्वी असें पर्व निर्माण केलें! हें नवें पर्व निर्माण करण्यांत ज्या प्रतिभासंपन्न ध्येयनिष्ठ प्रयोगशील नाटककारांनीं, नाट्यसंस्थांनीं आणि लोकोत्तर अशा कलावंतांनीं भाग घेतला होता त्यांची एक जंत्री एके ठिकाणी असणें अगत्याचें होतें.

श्री. के. टी. देशमुख रंगभूमिविषयक छायाचित्रांचा आपला दुर्मिळ असा चित्रसंग्रह सांगलीच्या राजेसाहेबांना दाखवीत आहेत.

'मराठी रंगभूमि' हा चित्रपट निर्माण करीत असलेल्या श्री. के. टी. देशमुख या कलावंतानें तीन वर्षें खूप परिश्रम करून आणि महाराष्ट्रांत आणि महाराष्ट्राबाहेर अनेक दौरे काढून जुन्या नाटकांचा आणि रंगभूमीवरील कलावंतांच्या जुन्या छायाचित्रांचा एक बहुमोलाचा संग्रह जमविला आहे. त्यांनी नट, नाटककार आणि नाट्यसंस्था यांच्या छायाचित्रांच्या जवळ जवळ पांच हजार नकला (निगेटिव्हज्) करून घेतल्या असून त्यावरून सुमारें दीड हजार मोठ्या आकाराचीं छायाचित्रें सुबक रितीनें तयार केली आहेत. काळाच्या उदरांत गडप झालेला मराठी रंगभूमीचा हा एक नवा आविष्कार—नव्हे तर इतिहासच—पुन्हां समोर उभा झालेला आहे! जुनीं नाटकें, जुनी हँडबिलें, हस्ताक्षरें, हिशोबाचे कागद, नाट्यविषयक मजकूर असणारी जुनीं वृत्तपत्रें, मासिकें इत्यादिकांचा दुर्मिळ असा संग्रह त्यांनीं परिश्रमपूर्वक संशोधीला आहे.

नटवर्य केशवराव दाते अमृत महोत्सवाचे सुप्रसंगीं या संग्रहामधील कांहीं निवडक छायाचित्रांचें आणि जुन्या ग्रंथांचें एक अभिनव असें प्रदर्शन मराठी नाट्य परिषदेमार्फत सांगलीस भरविण्यात आले. ह्या वैशिष्ट्यपूर्ण प्रदर्शनाची सांगलीच्या राजेसाहेबानीं खूप प्रशंसा केली आणि श्री. देशमुखांची पाठ थोपटली! नटवर्य श्री. केशवराव दाते, श्री. पु. भा. भावे, श्री. के. नारायण काळे, श्री. वा. य. गाडगीळ प्रभृतींनीं हा चित्रसंग्रह पाहून समाधान व्यक्त केलें.

●●●



'बाराबास' या चित्रपटांतील एक चित्तथरारक दृश्य

# बाराबास !

'**चोर** सोडून संन्याशी सूळीं' ही म्हण सुप्रसिद्ध आहे—परंतु या म्हणींतील चोराच्या जीवनावर आधारलेला असा हा चित्रपट कोलंबिया चित्रसंस्थेमार्फत मुंबईस लवकरच प्रकाशित होणार आहे.

एका बदमाष अट्टल चोराला सोडून देऊन त्याच्या ऐवजी येशु ख्रिस्ताला वध-स्तंभावर लटकावण्यांत येते. त्या चोराच्या मनोव्यापारांची कुशलतेनें जाणीव करून देणारा असा हा भावनामनोहर चित्रपट आहे. चोराच्या मनामधील संघर्ष आणि सत्याच्या शोधाकरितां त्यानें भोगलेले अपार कष्ट मोठ्या परिणामकारक रितीनें चित्रित करण्यांत आले आहेत.

नयनमनोहर देखाव्यांचीहि या चित्रांत लयलूट आहे. रोमन साम्राज्याचें वैभव आणि विलास ही या चित्राची पार्श्वभूमि असल्यानें एकंदर ८० चित्रणाचे देखावे तयार करण्यांत आले होते. रोमन लोकांचीं शस्त्रे, रथ दागदागिनें कपडेलत्ते भांडीकुंडी इ. सामुग्री ऐतिहासिक कालानुसार मुद्दाम खास तयार करण्यांत आली. बाह्य चित्रि-करण इटली देशांतील प्राचीन ऐतिहासिक अवशेषावर खास परवानगी मिळवून घेण्यांत आले. दोन हजार वर्षांपूर्वी रोमन साम्राज्या-मधील सर्वश्रेष्ठ अधिकारी सरदार आणि प्रजाजन ज्या सर्कसमध्यें बसून गुलामांच्या योद्धयांच्या आणि जनावरांच्या झुंजी पहात तिथें प्रत्यक्ष जाऊन या क्रूर करमणुकीचें चित्रिकरण करण्यांत आले. या प्रसंगी ४०,००० एक्स्ट्रा कलाकारांना काम देण्यात आले. ख्रिस्तवध झाल्यानंतर पृथ्वीवर काळोख पडला होता. म्हणून त्या प्रसंगाच्या चित्रिकरणाचा दिवस असा धरला होता कीं ज्या दिवशीं सूर्यग्रहण होतें !

अँथनी क्विन या गंभीर प्रकृतीच्या सामर्थ्य-शाली अभिनेत्यानें चोराच्या अन्तर्मनांतील झगडा प्रकर्षानें प्रकट केला आहे !.

**–चित्रगुप्त**

---

(पृष्ठ ६५ वरून)

लागले तेव्हां एके दिवशी त्यांनी ताडकन् सांगितलं, "हिंदू राज किसी भी तरह ब्रिटिश राजसे अच्छाहि होगा."

मरण्यापूर्वी रचलेल्या त्यांच्या ह्या दोन ओळी प्रसिद्ध आहेत:–

**"कुछ आरजू नहीं हैं, है आरजू तो यह**
**रख दे कोई जरा सी खाके-वतन कफनमे"**

"जास्त कांहीं नाहीं पण माझी इतकीच इच्छा आहे कीं कोणीतरी माझ्या कफनामध्यें थोडीशी मातृभूमीची रक्षा ठेवून द्यावी."

काकोरी कटाचे प्रमुख पंडित रामप्रसाद 'बिस्मिल' नांवानें उत्तम उर्दू शायरी करीत. मरण्यापूर्वी तीन दिवस आधीपर्यंत ते 'बिस्मिल की आत्मकथा' हे पुस्तक लिहित होते. फांशीच्या आदल्या रात्रीं त्यांना दुधाचा पेला आणून दिल्यावर ते उद्गारले.

"अब इसकी जरूरत नहीं, कल सवेरे भारतमांका दूध पीऊंगा.'

एका हिंदी काव्यांत ते म्हणतात:–

"यदि देशहित मरना पडे मुझको सहस्त्रो बार भी।
तो भी न मैं इस कष्ट को निज ध्यान में लाऊं कभी ।।"

वर वर्णन केलेल्या हुतात्म्यांची आणखी किती तरी भावंडं आहेत. त्यांची नांवं आणि त्यांचं कार्य अमर आहे. एका डोळस बटाट्यांतून शंभरावर बटाटे झाल्याची गोष्ट एकदां प्राथमिक पुस्तकांतून वाचली होती. भारताच्या स्वातंत्र्य लढ्यांत जिद्दीच्या पायी जीव ओंवाळून टाक-णारी तांब्यांची मनुताई–झांशीची राणी– हौतात्म्याचा होम पेटवून गेली. ह्या प्रजासत्ताक दिनीं म्हणूनच ह्या विजेच्या बीजांचं आणि त्यांच्या रक्तानें धुवून काढलेल्या मंत्राचं नामस्मरण करणं कृतज्ञतेचं द्योतक आहे असं मला वाटतं.

त्या हुतात्म्यांचं ध्येय, ध्यान, आस व कर्तृत्व ज्या ओळीमध्यें समाविष्ट होतं त्या—

**"सूख न जाय कहीं यह पौधा आजादी का**
**अपने खूनसे इसे इसलिए तर करते है"**

अमोघ शक्तिरूपी ओळींपासून आजच्या आपल्या पिढीनेंहि स्फूर्ति घेण्याची निकडीची गरज नाहीं काय ?

वंदे मातरम् !!

● ● ●







अनुक्रमणिका

